

ओ३म्

आर्यधर्म मासिक पुस्तकांतून प्रसिद्ध झालेल्या विषयांची ग्रन्थमाला.

चतुर्थपुष्प,

# राष्ट्रीसूक्त व त्याचा अर्थ.

---


संपादक

श्रीदास विद्यार्थी.


---


प्रकाशक,

शामराव कृष्ण आणि मंडळी

ठाकुरद्वार, मुंबई.

---

किंमत दीड आणा.

वेदादिसच्छास्त्रांचें ज्ञान करून देणारें

# आर्यधर्म

## धार्मिक मासिक पुस्तक.



सोप्या भाषेंत मूल वैदिक धर्माची माहिती करून देणारें हें पहिलेंच पुस्तक चैत्र शके १८२६ मार्च सन १९०४ पासून निघूं लागलें आहे. सनातन आर्यधर्माची ओळख करून घेणारानें अवश्य या पुस्तकाचें वाचन करून आपलें अमोलिक ग्रंथसंग्रहस्थान सुशोभित करावें. अवघ्या चवदा आणे किंमतींत अंतर्बाह्य सुंदर, सुबक, मोठें व प्रगल्भ असें मासिक पुस्तक आर्यधर्मासारखें क्वचितच मिळेल, जिज्ञासूनीं याचा अनुभव घ्यावा. किंमत वर्षाची ट. ख. सह आगाऊ ०१४ व्ही. पी. नें. ०१५ नमुन्याकरितां अंक मागविणारांनीं दीड आण्याचीं टिकिटें पाठवावीं.

शामराव कृष्ण आणि मंडळी,

प्रकाशक-आर्यधर्म,

ठाकुरद्वाराजवळ, मुंबई.

# दोन शब्द.

परमेश्वर हा सर्वांचा पिता आहे, त्यानें सर्वांच्या हितासाठीं हवा, पाणी, वनस्पति, अन्न, कंद, मूळें, फळें वगैरे पदार्थ केलेले आहेत. ज्यांच्या आंगांत त्या पदार्थांचा उपयोग करून घेण्याचें सामर्थ्य आहे ते त्या पदार्थांचा उपयोग करून सुखी होत आहेत. सर्व प्राणिमात्र पंचतत्त्वांच्या साहाय्यानें आपल्या भौतिक गरजा भागवून आनंदित होत आहेत. पक्षी अव्याहत रीतीनें हवेंत संचार करतात, पशू जमिनीवर व जलचर जलांत संचरून आपआपले भोग्य पदार्थ मिळवून त्यांचा उपभोग घेतात. हवेचा अमुक प्राण्यानें उपभोग घेऊं नये, किंवा पाणी अमुक प्राण्यांसाठींच आहे असें नाहीं, ज्याला तहान लागली आहे त्याच्यासाठीं पाणी आहे व श्वासोच्छ्वास करणारां-साठीं हवा आहे. सूर्याचा प्रकाशहि सर्वांसाठींच आहे. तो श्रीमंतांसाठीं आहे व गरी-बांसाठीं नाहीं असें कोण म्हणूं शकणार आहे? तात्पर्य ही परमेश्वराची भौतिक कृति जशी सर्व प्राणिमात्रांसाठीं आहे त्याचप्रमाणें परमेश्वरीय वेद हेहि विचार करूं शकणाऱ्या सर्व मनुष्यांसाठीं आहेत. एकाच प्रकारच्या लोकांचा त्यांवर हक्क आहे असें नाहीं. डोळसांसाठीं सूर्य, भुकेलेल्यांसाठीं अन्न, तहानेलेल्यांसाठीं पाणी, श्वासो-च्छ्वास करणारांसाठीं हवा व थंडीचें निवारण करूं इच्छिणारांसाठीं जसा अग्नि आहे त्याचप्रमाणें मननशक्ति ज्यांच्या जवळ आहे त्यांच्यासाठीं वेदांतील मंत्र आहेत; ते परमेश्वरानें मनुष्यांच्या उन्नतीसाठीं दिलेले आहेत; अर्थात् मननशक्ति ज्यांच्या जवळ आहे ते वेदाचे अधिकारी होत.

वेदांमध्यें आत्मिक, दैविक व भौतिक वगैरे सर्व तऱ्हेच्या विद्या आहेत; त्या शिकून सर्व मनुष्यांनीं आपआपली उन्नति करून घ्यावी, हा परमेश्वराचा उद्देश आहे. अनेक सूक्तांमध्यें अनेक विद्या सांगितल्या आहेत, त्याचप्रमाणें या राष्ट्रीसूक्तामध्यें राष्ट्रविद्या सांगितली आहे. राष्ट्र उदयास कसें येतें, त्याची भरभराट कशानें होते, अवनति कां होते, ती न होण्यास काय काय उपाय केले पाहिजेत; हें या सूक्तांत थोडक्यांत व स्पष्टपणानें सांगितलें आहे. प्रत्येक देशांतील माणसांनीं या वैदिक उपदेशाचें मनन करून, त्याप्रमाणें वागून आपली व परंपरेनें जगाची सुधारणा करण्यास साहाय्य करावें हीच प्रार्थना आहे.

# अर्पणपत्रिका.

रा .... ष्ट्री .... सू .... क्त

व

**त्याचा अर्थ**

नामक

लहानसें पुस्तक

जगांतील सर्व राष्ट्रभक्तांना

**अनन्यभावानें**

अर्पण केलें

आहे.

**श्रीदास विद्यार्थी.**

॥ ओ३म् ॥

# राष्ट्रीसूक्तम् ।

अहमित्यष्टर्चस्य सूक्तस्याम्भृणस्य महर्षेर्दुहिता वाङ्नाम्नी ऋषिः । वागाम्भृणी देवता । द्वितीया जगती शिष्टाः सप्त त्रिष्टुभः ॥

**अ॒हं रु॒द्रेभि॒र्वसु॑भिश्चराम्य॒हमा॑दि॒त्यैरु॒त वि॒श्वदे॑वैः ॥ अ॒हं मि॒त्रावरु॑णो॒भा बि॑भर्म्य॒हमि॑न्द्रा॒ग्नी अ॒हम॒श्विनो॒भा ॥१॥** ऋ.मं.१० सू.१२५.

**अन्वयः**—अहं वसुभिः रुद्रेभिः आदित्यैः उत विश्वदेवैः ( सह ) चरामि । अहं उभौ मित्रावरुणौ ( इव सर्वान् जनान् ) बिभर्मि । अहं इन्द्राग्नी बिभर्मि । ( तथैव ) अहं अश्विनौ ( इव जनान् ) बिभर्मि ॥

**भाष्यम्**—**अहं** वागाम्भृणी भरणपोषणकर्त्री वेदविद्या । **वसुभिः** वसन्ति ब्रह्मचर्यमिति वसवो ब्रह्मचारिणः चतुर्विंशतिवर्षपर्यंतं यैः ब्रह्मचर्यं धृतं ते वसुसंज्ञका ब्रह्मचारिणः तैः । यद्वा " वसुरिति धननामसु पठितं निघंटौ २।१०॥ " गौण्या वृत्त्या । धनिकैः सह । यद्वा अग्न्यादीनां अष्टानां वसूनां विज्ञानेन युक्ता तैः सह । यद्वा वासयन्ति मनुष्यादिप्राणिनो ये ते वसवो लोकरक्षकाः तैः सह । तथा च । **रुद्रेभिः** चतुश्चत्वारिंशद्वर्षात्मकं ब्रह्मचर्यव्रतं यैर्धृतं ते रुद्रसंज्ञका ब्रह्मचारिणः तैः सह । यद्वा पापिन आततायिनो नास्तिकान्वा । रोदयन्ति ते रुद्राः शत्रून् रोदयन्तीति वा तैः सह । **आदित्यैः** अष्टाचत्वारिंशद्वर्षात्मकं ब्रह्मचर्यं यैरुषितं ते आदित्यसंज्ञका ब्रह्मचारिणः । तेषामादित्यवद्विद्याप्रकाशकत्वात् । तैः सह । **उत** अथापि **विश्वदेवैः** सर्वैर्विद्वद्भिः । दातृभिः द्योतयितृभिः सह । " विद्वा ँसो हि देवाः इति शतपथे । कां० ३।७।६।१०॥ " " देवो दानाद्वा दीपनाद्वा द्योतनाद्वा द्युस्थानो भरतीति वा इति निरुक्तम् दै० अ० १।१५॥" **चरामि** संचरामि संगच्छामि सकलव्यवहारजातं संपादयामीत्यर्थः । **उभा** उभौ **मित्रावरुणा** मित्रावरुणसंज्ञकौ वायुविशेषौ जलोत्पादनकर्मणि यथा एकत्रैव वर्तेते तथैव ताविव सर्वान् जनान् **बिभर्मि** एकत्रीकरोमि । मित्रावरुणयोर्जलोत्पादनं कर्म प्रसिद्धं वेदे । यद्वा । " बाहू वै मित्रावरुणौ पुरुषो गर्तः । वीर्यं वा एतद्राजन्यस्य यद्बाहू ॥ शतपथ० ५ । ४ । ३ ॥ " अहं राजन्यस्य बाहू वीर्यं च बिभर्मि धारयामि पुष्णामि च । यद्वा । मिनाति मान्यं करोतीति मित्रः । व्रीयते सर्वैरिति

वरुणः वरणीयः तौ अहं बिभर्मि । तथैव । इन्द्राग्नी विद्युदग्निश्च । "स्तनयित्नुरेवेन्द्रः । स्तनयित्नुरशनिरिति । शतप० १४ । ५ ॥ यद्वा । इन्दत्यैश्वर्यवान् भवतीति इन्द्रः । अग्रणीरग्निः । "अग्निः कस्मादग्रणीर्भवतीति । निरुक्तं ७ । १४ ॥" तथा च । **अश्विनौ** आशुगमनशीले विद्युदन्तर्भूते द्वे शक्ती यथा ऐक्यभावेन वसतः तथैव **अहं** आम्भृणीवाक् सर्वान् जनान् ऐक्यभावेनैव **बिभर्मि** धारयामि पुष्णामि च । वसुरुद्रादित्यानां ब्रह्मचर्यव्रतवर्षमर्यादा छांदोग्योपनिषदि "पुरुषो वाव यज्ञस्तस्य यानि चतुर्विंꣳशति वर्षाणि तत्प्रातःसवनम्० ।" "अथ यानि चतुश्चत्वारिꣳशद्वर्षाणि तन्माध्यंदिनꣳसवनम्० ।" "अथ यान्यष्टाचत्वारिꣳशद्वर्षाणि तत्तृतीयसवनम्० ॥ छां० प्र० ३ । १६ ॥" "अथ यद्यज्ञ इत्याचक्षते ब्रह्मचर्यमेव तत् । ब्रह्मचर्येण ह्येव यो ज्ञाता तं विंदते ॥ छां० प्र० ८ । ५ ॥" इत्यादि प्रकारेणोक्ता इति दिक् ॥ १ ॥

**अर्थ**—( **अहं** ) मी **आम्भृणीवाक्** आहें. ( **मी आम्भृणी वाणीला प्रकाशित करणारी शक्ति आहें** ). [ आम्भृणी म्हणजे भरण व पोषण करण्यास समर्थ अशी वाक् म्ह० वाणि, विद्या किंवा वेदविज्ञान. विद्या ही ज्याप्रमाणें एका व्यक्तीचें, त्याचप्रमाणें राष्ट्राचेंहि भरण व पोषण करण्यास समर्थ असते ]. ती मी ( **वसुभिः** ) चोवीस वर्षेपर्यंत ज्यांणीं ब्रह्मचर्यव्रत धारण केलें आहे, अग्नि, पृथिवी, वायु, अंतरिक्ष, आदित्य, द्यौः, चंद्रमा व नक्षत्रें या आठ वसूंचें विज्ञान ज्यांना झालें आहे, जे धनिक आहेत व जे लोकरक्षक आहेत त्यांना वसू असें म्हणतात ; त्यांसह, तसेंच ( **रुद्रेभिः** ) चवेचाळीस वर्षेपर्यंत ज्यांणीं ब्रह्मचर्य पाळलें आहे, आठ वसू व अकरा रुद्र [ पंचप्राण+पंचउपप्राण+आत्मा हे अकरा रुद्र होत. ] यांचें ज्यांना विज्ञान प्राप्त झालें आहे, व जे पापी, आततायी, परस्वापहारक, नास्तिक व शत्रू यांना रडवितात त्यांना रुद्र असें म्हणतात; त्यांसह, तसेंच ( **आदित्यैः** ) अठ्ठेचाळीस वर्षांचें उत्तम ब्रह्मचर्य ज्यांनीं पाळलें व आठ वसू अकरा रुद्र व बारा आदित्य यांचें विज्ञान ज्यांना प्राप्त झालें आहे व जे विद्येनें सूर्याप्रमाणें तेजस्वी बनले आहेत त्यांना आदित्य असें म्हणतात, त्यांसह ( **उत** ) आणि ( **विश्वदेवैः** ) सर्व जगांतील दिव्य शक्तींला जाणणाऱ्या, विद्वान्, दानशूर व मार्गदर्शक लोकांसह, ( **चरामि** ) संचार व संगति करतें. [ वागाम्भृणी नामक वेदविद्येचा प्रकाश पूर्वोक्त ज्ञानी लोकांच्या अंतःकरणांत पडलेला असतो त्यांच्या सहवासानें तो इतरांस लाभतो. विद्वानांच्या संगतीनें सर्वांला जडचेतनात्मक सर्व पदार्थमात्रांचें विज्ञान प्राप्त होऊन सर्वांला आप-

---

( १ ) विद्वानांला " देव " असें म्हणतात असें शतपथांत ( ३।७।६।१० ) सांगितलें आहे. व त्याचप्रमाणें " दाता, प्रकाशक, दर्शक " असे देवशब्दाचे अर्थ निरुक्तांत ( ७।१५ ) दिले आहेत.

आपलीं कर्तव्यें करतां येतात. ] ( **उभा** ) दोनही ( **मित्रावरुणा इव** ) मित्र व वरुण संज्ञक वायू ज्याप्रमाणें जल उत्पन्न करण्याच्या वेळीं एकत्र असतात, त्याच प्रमाणें माझ्या ( वेदविद्येच्या ) ज्ञानानें प्रेरित होत्साते सर्व लोक ( **अहं बिभर्मि** ) एकत्र होतात. अर्थात् विद्येच्या प्रसारानें ऐक्यता वाढते क्षत्रियांचे बाहू व वीर्य यांचा प्रभावहि विद्येच्या प्रसारानें वाढतो. वैदिकज्ञानानें राष्ट्रांतील लोकांमध्यें आत्मिक बल वाढतें व त्यामुळें बाहुबल व वीर्य यांतील जोम वाढून साहस करण्याची शक्ति वाढते. किंवा मित्र व वरुण यांचे अर्थ अनुक्रमें "सुहृत्" व "सर्वांनीं आदर व स्वीकार करण्यास योग्य" असेहि होतात. पूर्वोक्त विद्येच्या प्रसारानें लोकांत विचारांचें ऐक्य वाढतें व त्यामुळें परस्परांत स्नेहभाव वाढविणारे व सर्वांला पूज्य असे लोक निपजतात व असलेले पुढें येतात. याचप्रमाणें ( **इन्द्राग्नी** ) विद्युत् व अग्नि आणि ( **अश्विनौ** ) अत्यंत वेगवान् अशा ज्या विजेमध्यें धन व ऋण शक्ती आहेत त्या जशा एकत्र राहतात त्याचप्रमाणें वागाम्भृणीच्या अर्थात् वेदविद्येच्या व ती विद्या जाणणाऱ्या विद्वानांच्या योगानें सर्व लोकांत ऐक्यभाव उत्पन्न होतो. किंवा ऐश्वर्यवा-नांला इंद्र व अग्रणीला अग्नि असेंहि म्हणतात. विद्येच्याच योगानें ऐश्वर्य व लोकाग्रणित्व हीं प्राप्त होतात. [ छांदोग्य उपनिषदांत ब्रह्मचर्यव्रताची वर्षमर्यादा सांगितली आहे. ती अशी:—"पुरुषाचें आयुष्य हा एक यज्ञ आहे, त्यांत पहिलीं चोवीस वर्षें हें प्रातः सवन, चवेचाळीस वर्षें हें माध्यंदिनसवन व अठ्ठेचाळीस वर्षें हें तृतीयसवन होय." यज्ञ म्हणजे काय अशी कोणास शंका येईल म्हणून पुढे सांगितलें आहे कीं, "ब्रह्मचर्य हाच यज्ञ होय" "पुरुषो वाव यज्ञः०" या प्रकरणावर श्रीशंकराचार्यांनीं भाष्य करते-वेळीं असा प्रारंभ केला आहे:—"**अथेदानीं आत्मनो दीर्घजीवनाय इदमु-पासनं जपं च विदधदाह । पुरुषो वाव यज्ञ इति ।**" "आपलें आयुष्य वाढविण्याचें ज्यामध्यें सामर्थ्य आहे अशी उपासना व जप 'पुरुषो वाव यज्ञ' या प्रकरणांत सांगितला आहे." यावरूनहि ब्रह्मचर्याची कल्पना होते, कारण ब्रह्मचर्यानें आयुष्यवृद्धि होते असें वैद्यग्रंथांतहि सांगितलें आहे. ]

---

( १ ) मित्र व वरुण हे वायू जल उत्पन्न करतात याविषयीं वेदांमध्यें वायुसूक्तांत अनेक मंत्र आहेत. "**मित्रं हुवे पूतदक्षं वरुणं च रिशादसं । धियं घृताचीं साधन्ता ॥** ऋ० अ० १ सू० १ मं० ७।। शब्दार्थ—"( पूतदक्षं मित्रं ) बलवान् मित्र नामक वायू व ( रिशादसं वरुणं च ) शत्रुभूत पदार्थभक्षक वरुण नामक वायू, या दोनहि वायूंचा ( हुवे ) स्वीकार करतों. हे स्वीकार केलेले दोनहि वायू ( घृताचीं धियं ) पाणी उत्पन्नकरण्याचें कर्म ( साधन्ता ) साध-तात." घृत शब्दाचा "उदक" असा व "धी" शब्दाचा "कर्म" असा अर्थ निरुक्तांत दिलेला आहे. अशा तऱ्हेचे मंत्र वेदामध्यें पुष्कळ आहेत ते वाचकांनीं पहावे. ( २ ) "क्षत्रि-याचे बाहू व वीर्य यांना मित्र व वरुण असें म्हणतात" असें शतपथ ब्राह्मणांत ( ५।४।३ ) सांगितलें आहे. (३) 'ब्रह्मचर्य' या विषयावरचा निबंध पहा. (पृ. ८-११) किं. चार आणे.

**भावार्थ**—परमेश्वर उपदेश करतो कीं, राष्ट्राची भरभराट करणारी वागाम्भृणी (वेद) विद्या हीच एक शक्ति आहे. ही चोवीस वर्षेपर्यंत ब्रह्मचर्य धारण करणारे, धार्मिक, धनिक, लोकांचें रक्षण करणारे, पदार्थविज्ञानी, चवेचाळीस वर्षांचें ब्रह्मचर्य पालन करणारे, पापी लोकांना सन्मार्गाला लावणारे, लोकांना गांजणाऱ्यांना शिक्षा करणारे, नास्तिक मताचें खंडण करणारे, शत्रूंचा विध्वंस करणारे, अठ्ठेचाळीस वर्षेपर्यंत ब्रह्मचर्य पालन करून पूर्ण विद्वान् बनलेले, विद्येचा प्रसार करणारे, विद्वान, दानशूर, मार्गदर्शक, इत्यादि लोकांत प्रगट असते. या विद्येच्या योगानें विचाराचें ऐक्य होऊन एकराष्ट्रीयत्वाच्या कल्पनेची जागृति होऊन त्यांच्याकडून सर्व व्यवहार उत्तम रीतीनें पार पडतात. विद्येच्या योगानेंच क्षत्रियांचें बाहुबल व वीर्य वाढतें व सर्वांचा स्नेही व सर्वांच्या आदरास पात्र झालेला, जो असतो त्याचा उत्साह वाढतो. विद्येच्या योगानेंच ऐश्वर्यवानांला व लोकाग्रणीला धैर्य येतें व हिच्याच योगानें सर्व लोक मित्र वरुणांप्रमाणें, विद्युत् व अग्नि यांप्रमाणें किंवा ऋण व धन या विद्युत्प्रवाहांप्रमाणें एकत्र होऊन काम करतात व विद्येच्याच योगानें सर्वांमध्यें एकप्रकारची अद्भुत शक्ति उत्पन्न होते.

## अहं सोममाहनसं बिभर्म्यहं त्वष्टारमुत पूषणं भगम् ॥ अहं दधामि द्रविणं हविष्मते सुप्राव्ये३ यजमानाय सुन्वते ॥२॥

**अन्वयः**—आहनसं सोमं अहं विभर्मि । अहं त्वष्टारं उत पूषणं भगं च बिभर्मि । तथा च अहं हविष्मते सुप्राव्ये सुन्वते यजमानाय द्रविणं दधामि ॥

**भाष्यम्**—**आहनसं** शत्रूणां आहन्तारं यद्वा शत्रून्विनाशिषुं । **सोमं** उमया विद्यया सहितं सोमं विद्वांसमिति यावत् । "उमां विद्यामिति श्रीशंकराचार्यः केनोपनिषद्भाष्ये ३।१२॥" यद्वा । सोमं शान्त्यादिशोभनगुणयुक्तं पुरुषं । यद्वा । सवत्यैश्वर्यहेतुर्भवतीति सोमस्तं **अहं** आम्भृणीवाग् **बिभर्मि** धारयामि पुष्णामि च । तथा च **अहम्** । **त्वष्टारं** शिल्पिनं दीपयितारं वा । यद्वा त्वक्षति तनूकरोति काष्ठादिकं शिल्पकार्यत्वात् तं यंत्ररचकं । **उत** अथापि । **पूषणं** पोषकं **भगं** धनविद्यैश्वर्ययुक्तं पुरुषम् । "भग इति धननामसु निघं० २।१०॥" धारयामि वर्धयामि च । तथा चाहं । **हविष्मते** हविर्भिर्युक्ताय दानादानकर्मणि रताय वा । "हु दानादानयोः ।" **सुप्राव्ये** शोभनेन हविषा तर्पयित्रे । **सुन्वते** ऐश्वर्यहेतुभूताय **यजमानाय** देवपूजासंगतिकरणदानकर्मणि रताय पुरुषाय । **द्रविणं** धनं बलं च "द्रवि-

णमिति बलनामसु०।२।९॥ धननामसु०।२।१०॥ च पठितं निघं०॥" **दधामि** धारयामि ददामि वा ॥ २ ॥

**अर्थ**—( **आ+हनसं** ) शत्रूंचा निःपात करणारा किंवा शत्रूंचा नाश करूं इच्छिणारा, असा जो ( **स+उमं=सोमं** ) विद्वान्, शांत, धैर्यवान् व ऐश्वर्याला हेतुभूत पुरुष असतो, त्याला ( **अहं** ) मी वागाम्भृणी—( विद्यारूपी परमात्मशक्ति ) ( **बिभर्मि** ) धारण करतें. पोषण करतें किंवा उत्साहित करतें. विद्येच्या योगानें शत्रूंला आवरण्याचें सामर्थ्य अंगीं येतें. त्याचप्रमाणें जे जे कोणी ( **त्वष्टारं** ) शिल्पकला जाणणारे, यंत्रविद्येंत प्रवीण असे असतात व **पूषणं** पोषक व ( **भगं** ) धन, विद्या, व इतर ऐश्वर्यें यांनीं युक्त असतात, त्या सर्वांची या विद्येच्या योगानें उन्नति होते. तसेंच जे ( **हविष्मते** ) सर्व प्रकारच्या यज्ञांला अवश्य लागणाऱ्या द्रव्यांना एकत्र करणारे व त्यांचे दान व ग्रहण करणारे असतात, जे ( **सुप्राव्ये** ) आपल्या जवळच्या साधनांनीं दुसऱ्यांला सहाय्य करतात, जे ( **सुन्वते** ) ऐश्वर्यवृद्धींचे उपाय करीत असतात, आणि जे ( **यजमानाय** ) सज्जनांचा सत्कार, मैत्री व परोपकार करतात त्यांना ( **अहं** ) मी विद्या ( **द्रविणं** ) धन व बल ( **दधामि** ) देतें.

**भावार्थ**—शत्रूंचा निःपात करणारा किंवा करूं इच्छिणारा विद्वान्, धैर्यवान् व उद्योगी पुरुष विद्येच्या बलानेंच उत्साहित होतो. जे कोणी शिल्पशास्त्रांत प्रवीण, लोकांचें पोषण करणारे, धनवान् व इतर सर्व संपत्तीनीं युक्त असतात, त्या सर्वांत विद्येच्या योगानेंच प्रेरणा होते. त्याचप्रमाणें जे लोक साधन व संपन्न असून दुसऱ्यांस सहाय्य करणारे असतात, जे उन्नतीसाठीं अलोट यत्न करतात, सज्जनांशीं मैत्री करून त्यांचा यथायोग्य सत्कार करतात, व जे परोपकारासाठीं स्वार्थत्याग करण्यास सिद्ध असतात, या सर्व लोकांना विद्येच्या सहाय्यानेंच द्रव्य प्राप्त होतें.

**अहं राष्ट्रीं संगमनी वसूनां चिकितुषीं**
**प्रथमा यज्ञियानाम्॥ तां मां देवा व्यदधुः**
**पुरुत्रा भूरिस्थात्रां भूर्यावेशयन्तीम् ॥ ३ ॥**

**अन्वयः**—अहं राष्ट्री वसूनां संगमनी। चिकितुषी यज्ञियानां प्रथमा अस्मि। तां मां भूरिस्थात्रां भूरि आवेशयन्तीं देवाः पुरुत्राः व्यदधुः॥

**भाष्यम्**—**अहं राष्ट्री** राजते तद्राष्ट्रं तस्य बीजभूता शक्तिः राष्ट्री। यद्वा राष्ट्रं उत्पत्तित्वेन अस्ति अस्यामिति राष्ट्री "वाग्वै राष्ट्री वाचमेवास्मिंस्तद्दधाति"॥ ऐ. ब्रा. प्र. पञ्चिका. अ. ४ खं. २ ॥ साहं। **वसूनां** धनानां **संगमनी** संगमयित्री

भक्तानां प्रापयित्री । यद्वा वसुसंज्ञकानां ब्रह्मचारिणां संगमयित्री तेषां परस्परं स्नेहभाव वर्धयित्री । यद्वा धनिकानां लोकरक्षकाणां संगमयित्री । **चिकितुषी** साक्षात्कर्तव्यं यज्ज्ञानं तेन युक्ता, दुःखापनयनकर्त्री वा । "कित निवासे रोगापनयने च ।" **यज्ञियानां** उपासनार्हाणां **प्रथमा** मुख्या अस्मि । या एवं गुणविशिष्टाहं **तां मां भूरिस्थात्रां** बहुभावेन सर्वत्र तिष्ठन्तीम् । **भूरि** भूरीणि बहूनि भूतजातानि **आवेशयन्तीं** आधारत्वेन निवेशयन्तीं आवेशयुक्तानि वा कुर्वन्तीं मां **देवाः** दानशीला ज्ञानप्रसारका विद्वांसः । **पुरुत्रा** बहुषु देशेषु **व्यदधुः** विशेषेण धारितवन्तः । उक्त प्रकारेण सर्वत्रावस्थानाद् देवा यद् यद् कुर्वन्ति तत्सर्वं मामेव कुर्वन्तीत्यर्थः ।। ३ ।।

**अर्थः**—( **अहं** ) मी ( **राष्ट्री** ) सर्वत्र प्रकाशित परमात्मशक्ति किंवा व्यष्टीनें राष्ट्रशक्ति आहें. [ प्रकाशणारें तें राष्ट्र व त्याची शक्ति वाणी ही राष्ट्राची शक्ति आहे ती राष्ट्री होय ] या शक्तीच्या योगानें ( **वसूनां** ) ब्रह्मचारी, लोकरक्षक व धानिक यांच्यांत परस्परांत (**संगमनी**) स्नेहभाव उत्पन्न होतो. सर्व प्रकारच्या संपत्ति एकत्र होतात. ( **चिकितुषी** ) अनुभवजन्यज्ञानानें ती युक्त आहे किंवा भक्तांचें दुःख नाहींसें करणारी आहे. ( **यज्ञियानां प्रथमा** ) सर्व राष्ट्रीय उपास्य देवतांमध्यें तिची उपासना प्रथम करण्यास योग्य आहे. ( **तां मां** ) अशा तऱ्हेनें गुणयुक्त असणारी मी ( **भूरिस्थात्रां** ) सर्वत्र असतें व ( **भूरि** ) अनेक मनुष्यादि प्राण्यांला ( **आवेशयन्तीं** ) आधार देतें व आवेशयुक्त करतें. सर्व देशांतील ( **देवाः** ) दानशील व ज्ञानप्रसार करणारे विद्वान् लोक ( **पुरुत्रा** ) अनेक देशांमध्यें ( **व्यदधुः** ) विशेषरीतीनें मला भजतात. वर सांगितल्याप्रमाणें मी सर्वत्र असल्यामुळें विद्वान् लोक जे जे कांहीं प्रयत्न करतात, ते ते सर्व माझ्या प्राप्तीसाठींच करीत असतात.

**भावार्थ**—मी राष्ट्रोन्नति करविणारी शक्ति आहें, ब्रह्मचारी, लोकांचें रक्षण करणारे व धनिक यांच्यांत स्नेहभाव वाढवून त्या सर्व लोकांमध्यें माझे जे परम भक्त असतात त्यांना मी धन प्राप्त करून देतें. माझ्यासाठीं जें जें कांहीं करावयाचें असेल तें तें सर्व सर्वांनीं योग्यवेळीं केलेंच पाहिजे. कारण मी सर्व राष्ट्रीय उपास्यांमध्यें मुख्य उपास्य आहें. माझ्या भक्तीनेंच जनतेचें कल्याण होतें. मी सर्वत्र असून अनेक मनुष्यांमध्यें जेव्हां एकदम एक विचार उत्पन्न होतात तेव्हां त्या सर्व मनुष्यांमध्यें एक प्रकारचा विलक्षण आवेश उत्पन्न करतें. म्हणूनच सर्व देशांतील विद्वान् लोक माझीच भक्ति करीत असतात.

**मया॒ सो अन्न॑मत्ति॒ यो वि॒पश्य॑ति॒ यः प्रा-**
**णि॑ति॒ य ईं॑ शृ॒णोत्यु॒क्तम् ॥ अ॒म॒न्तवो॑**

## मां त उपंक्षयन्ति श्रुधि श्रुत श्रद्धिवं ते वदामि ॥ ४ ॥

**अन्वयः**—यः विपश्यति यश्च प्राणिति य ईं उक्तं शृणोति । स एव मया अन्नं अत्ति । ये मां अमन्तवः ते उपक्षयन्ति । हे श्रुत ! श्रद्धिवं श्रुधि । ते वदामि ॥

**भाष्यम्ः—यः** विद्वान् पुरुषः **विपश्यति** एवं प्रकारेण विशेषेण पश्यति । यश्च **प्राणिति** जीवति बलवान् भवतीति वा । " प्राणो वै बलं तत्प्राणे प्रतिष्ठितं तस्मादाहुर्बलꣳ सत्यादोजीय इति शतपथ० १४।८।१।६ ॥ " यश्च **ईं** निश्चयेन एतदुक्तं **शृणोति** तथा च स्वयमाचरति । **स** एव **मया** सहाय्यभूतया **अन्नं** भोग्यवस्तुजातं **अत्ति** भुनक्ति । ये अविद्वांसः पुरुषा **मां** राष्ट्रीं **अमन्तवः** अमन्यमानाः तिरस्कुर्वाणः सन्ति । **ते उपक्षयन्ति** उपक्षीणा भवन्ति बलादिना हीना भवन्तीत्यर्थः । हे **श्रुत** ! हे विश्रुत ! हे श्रद्धालो सखे ! **श्रद्धिवं** श्रद्धया युक्तं श्रद्धायत्नेन लभ्यं मया उक्तं वक्ष्यमाणं च चित्तैकाग्र्यणे । **श्रुधि** शृणु । त्वं श्रद्धायुक्तोसि अतस्ते तुभ्यं वदामि ॥४॥

अर्थ—( **यः** ) जो विद्वान मनुष्य ( **वि-पश्यति** ) याप्रमाणें विशेष रीतीनें पहातो, व ( **यः** ) जो ( **प्राणिति** ) बलयुक्त असतो, व ( **यः** ) जो ( **ईं** ) खरोखर हें ( **उक्तं** ) मी सांगितलेलें ( **शृणोति** ) ऐकतो व त्याप्रमाणें स्वतः आचरण करतो, ( **सः** ) त्यालाच ( **मया** ) माझ्या सहाय्यानें ( **अन्नं** ) भोग्य पदार्थ ( **अत्ति** ) उपभोगासाठीं मिळतात. पण जे अविद्वान् मनुष्य असतात ते ( **मां** ) माझी ( **अमन्तवः** ) अवहेलना करतात, अर्थात् जे माझी भक्ति करीत नाहींत ( **ते उपक्षयन्ति** ) त्यांचा नाश होतो, त्यांच्यांत बल राहत नाहीं. हे ( **श्रुत** ) विद्वान् श्रद्धायुक्त पुरुषा ! हें ( **श्रद्धिवं** ) श्रद्धेनेंच मिळण्यास योग्य असें जें मी सांगितलेलें ज्ञानामृत आहे त्याचें एकाग्र अंतःकरणानें ( **श्रुधि** ) श्रवण कर. तूं श्रद्धालू आहेस म्हणूनच मी हें ( **ते वदामि** ) तुला सांगत आहें.

**भावार्थ**—ज्या मनुष्याला माझा उपदेश उत्तम रीतीनें समजतो, जो त्याप्रमाणें स्वतः वागूं लागतो व जो स्वतः बलवान् असतो, त्याच्यावर माझी कृपा होते व तीमुळें त्यालाच सर्व उपभोग प्राप्त होतात. जे अज्ञानी मनुष्य माझी उपेक्षा करतात त्यांचा नाश होतो, म्हणून माझा तिरस्कार किंवा माझ्याशीं उदासीनता कोणीहि करूं नये. राष्ट्रोन्नतीकरितां प्रवृत्त झालेल्या श्रद्धालू माणसांनीं हें ऐकून त्याप्रमाणें वागावें म्हणजे त्यांची उन्नति होईल.

## अहमेव स्वयमिदं वंदामि जुष्टं देवेभिरुत

**मानुषेभिः ॥ यं कामये तं तमुग्रं कृणोमि तं ब्रह्माणं तमृषिं तं सुमेधाम् ॥ ५ ॥**

**अन्वयः**—अहं स्वयमेवेदं वदामि । देवेभिरुत मानुषेभिः अपि जुष्टं । यं कामये तं तं उग्रं कृणोमि । तं ब्रह्माणं तं ऋषिं तं सुमेधां कृणोमि ।

**भाष्यम्**—**अहं** त्वां श्रद्दधानं **स्वयमेवेदं वदामि** उपदिशामि । यत् **देवेभिः** विद्वद्भिः सत्यनिष्ठैः । **उत** अथापि । **मानुषेभिः** मनुष्यैः **जुष्टं** सेवितम् । "द्वयं वा इदं न तृतीयमस्ति सत्यं चैवानृतं च । सत्यमेव देवा अनृतं मनुष्याः । इदमहमनृतात्सत्यमुपैमि । तन्मनुष्येभ्यो देवानुपैति । स वै सत्यमेव वदेत् । एतद्धवै देवा व्रतं चरन्ति यत्सत्यं तस्मात्ते यशो यशो ह भवन्ति । य एवं विद्वान् सत्यं वदति मनो ह वै देवा मनुष्यस्य ॥ शतपथ० १।१।१।५॥" **अहं यं** पुरुषं **कामये** रक्षितुमिच्छामि **तं तं** पुरुषं **उग्रं** भीषणं । उच्यति समवैतीति उग्रः तं उत्कटं क्षात्रधर्मयुक्तं वा करोमि । **तं ब्रह्माणं** ज्ञानिनं, **तं ऋषिं** अतीन्द्रियार्थदर्शिनं, **तं सुमेधां** शोभनप्रज्ञायुक्तं च **कृणोमि** करोमि ॥ ५ ॥

**अर्थ**—( **अहं** ) मी राष्ट्री ( परमात्मशक्ति ) श्रद्धायुक्त असणाऱ्या अशा तुला ( **स्वयमेव** ) स्वतःच ( **इदं** ) हें ( **वदामि** ) सांगतें, हा उपदेश मी तुला स्वतः करीत आहें. या उपदेशाप्रमाणें ( **देवेभिः** ) विद्वान् व सत्यनिष्ठ ( **उत** ) आणि ( **मानुषेभिः** ) साधारण मनुष्यहि ( **जुष्टं** ) वागत असतात. अर्थात् हा उपदेश त्यांना मान्य आहे. [ "सत्याचरण करतात ते देव व सत्यावर ज्यांची एकनिष्ठा नसते ते मनुष्य होत," असें शतपथामध्यें सांगितलें आहे. ] ( **यं** ) ज्या वेदाज्ञेप्रमाणें चालणाऱ्या पुरुषाचें रक्षण करण्याची ( **कामये** ) इच्छा करतें ( **तं** ) त्या त्या पुरुषाला मी ( **उग्रं** ) उग्रस्वरूप करतें, किंवा त्याच्यांत क्षात्रतेज वाढवितें. तसेंच त्याला ( **ब्रह्माणं** ) लोककल्याणार्थ सर्वस्व देणारा ज्ञानी व त्यालाच ( **ऋषि** ) अतींद्रियज्ञानानें युक्त, वेदाचें रहस्य जाणणारा व ( **तं** ) त्यालाच ( **सुमेधां** ) उत्तम प्रज्ञायुक्त ( **कृणोमि** ) करतें.

**भावार्थः**—**ब्रह्मचर्य धारण करणें, परोपकार करणें, ज्ञान संपादन करणें व त्याचा प्रसार करणें वगैरे पूर्वी सांगितलेला उपदेश सर्वांनीं मान्य करण्यासारखा आहे. जो या उपदेशाप्रमाणें वागतो त्याचें संरक्षण राष्ट्रीसंज्ञक परमात्मशक्ति करते. असे मनुष्य राष्ट्रशक्तीच्या योगानें व आत्मिक बलानें उत्तम ज्ञानी, उत्तम क्षत्रिय, दुसऱ्याचें दुःख निवारण करण्यासाठीं सर्वस्व देणारे, अतींद्रिय गोष्टी जाणणारे व उत्तम बुद्धिमान् असे होतात.**

**अहं रुद्राय धनुरा तनोमि ब्रह्मद्विषे शरवे हन्तवा उं ॥ अहं जनाय समदं कृणोम्यहं द्यावापृथिवी आविवेश ॥ ६ ॥**

**अन्वयः**—अहं रुद्राय धनुः आतनोमि । किमर्थं ? । ब्रह्मद्विषे शरवे हन्तवै उ । अहं जनाय समदं कृणोमि । अहं द्यावापृथिवी आविवेश ॥

**भाष्यम्**ः—**अहं** राष्ट्री ! **रुद्राय** शत्रून् रोदयित्रे मध्यमब्रह्मचर्यधारिणे वा । **धनुः** धन्यते धनं प्राप्यतेऽनेनेति धनुः शास्त्रं शस्त्रं च तत् । **आतनोमि** सज्जं करोमि। किमर्थम् । **ब्रह्मद्विषे** ब्रह्मविद्याद्वेष्टारं । **शरवे** हिंसकं च । **हंतवै** हन्तुम् । **उ** निश्चयेन । **अहं** एव **जनाय** मद्भक्तजनरक्षणार्थं । **समदं** माद्यन्त्यस्मिन्निति समत् संग्रामः तं । कृणोमि करोमि । तथाच अहं **द्यावापृथिवी** दिवं च पृथिवीं च । यद्वा मानसं च शरीरं च सर्वत्रेत्यर्थः । **आविवेश** प्रविष्टा भवामि ॥ ६ ॥

**अर्थ**— **अहं** मी (**रुद्राय**) शत्रूंला रडविणाऱ्या शूराला किंवा चवेचाळीस वर्षांचें मध्यम ब्रह्मचर्य धारण केलेल्या पुरुषाला अनुक्रमें (**धनुः**) शस्त्र किंवा शास्त्र (ज्यानें धन प्राप्त होतें त्याला धनु असें म्हणतात. शस्त्र किंवा शास्त्र यांच्या योगानें धन मिळतें म्हणून त्यांनाहि धनु असें म्हणतात.) **आतनोमि** यांची सर्वत्र प्राप्ति होण्याची स्थिति करून देतें. त्याच्या योगानें त्यानें (**ब्रह्मद्विषे**) नास्तिक, विद्येचा द्वेष करणारे व सज्जनांची निंदा करणारे व (**शरवे**) हिंसा करणारे जे असतील त्यांचा (**हंतवै**) नाश करावा. इतकेंच नव्हे तर (**अहं**) मी (**जनाय**) राष्ट्रभक्तांच्या रक्षणासाठीं (**समदं**) त्यांना युद्ध करण्यास प्रवृत्त (**कृणोमि**) करतें. व मी (**द्यावापृथिवी**) आकाश व पृथिवी यांमध्यें, किंवा मन व शरीर यांमध्यें (**आविवेश**) भरून राहतें, किंवा आवेश उत्पन्न करतें.

**भावार्थ**—नास्तिक, विद्येचा द्वेष करणारे, सज्जनांला गांजणारे व दुसऱ्यांला दुःख देणारे जे लोक असतात त्यांचा नाश करण्यासाठीं राष्ट्रीसंज्ञक परमात्मशक्ति ही शूर वीरांच्या हातांत शस्त्र देते व ब्रह्मचारी लोकांच्या हातांत शास्त्र देते. इतकेंच नव्हे तर लोकांचें रक्षण करण्यासाठीं युद्ध करावयासहि तीच शक्ति लोकांस प्रवृत्त करते. ती राष्ट्रशक्ति सर्व लोकांच्या मनांत विलक्षण प्रेरणा करते व त्याच्या योगानें शरीरा कडूनहि विलक्षण कामें होऊं लागतात, व त्यामुळें असें वाटतें कीं, सर्वत्र ती शक्ति भरलेली आहे.

**अहं सुवे पितरमस्य मूर्धन् मम योनिर-प्स्व१न्तः समुद्रे ॥ ततो वितिष्ठे भुवनानु विश्वोतामुं द्यां वर्ष्मणोपस्पृशामि ॥ ७ ॥**

**अन्वयः**—अहं पितरं अस्य मूर्धन् सुवे । मम योनिः अप्सु अंतःसमुद्रे च अस्ति । ततो विश्वाभुवनानु वितिष्ठे । उतामुं द्यां वर्ष्मणा उपस्पृशामि ॥

**भाष्यम्**—**अहं** राष्ट्री । **पितरं** पाति रक्षतीति पिता तं । **अस्य** राष्ट्रस्य । **मूर्धन्** मूर्धनि । **सुवे** जनयामि । **मम योनिः** कारणं निमित्तं वा । **अप्सु** व्यापनशीलासु धीवृत्तिषु कर्मसु वा । "अपः इति कर्मनामसु निघं० पठितं ॥ २ । १ ॥" तथाच मम उत्पत्तिः **अंतःसमुद्रे** समुद्रवन्त्यस्माद्भूतानि इति समुद्रः तस्मिन् । यद्वा "समित्येकीभावे ॥ निरु० १ । ३ ॥" "उदित्युत्कर्षे ।" "द्रु गतौ ।" एकीभूय संगत्य उत्कर्षं गच्छन्ति जना येन सः समुद्रः उत्कर्षहेतुभूतं सर्वैर्जनैर्मिलित्वा कर्तुं योग्यं कर्म तस्मिन् मम योनिः उत्पत्तिरस्ति । मम प्रभावोऽत्रैव दृश्यते । **ततः** तस्मात् **विश्वाभुवनानि** विश्वानि सर्वाणि भुवनानि अनुप्रविश्य अहं **वितिष्ठे** । **उत** अथापिच **अमुं द्यां वर्ष्मणा** देहेन **उपस्पृशामि** ॥ ७ ॥

**अर्थ**—( **अहं** ) मी माझ्या आज्ञेप्रमाणें वागून राष्ट्रोन्नतीची इच्छा करणाऱ्या ( **अस्य** ) राष्ट्राच्या ( **मूर्धन्** ) अग्रभागीं ( **पितरं** ) रक्षण करणाराची ( **सुवे** ) उत्पत्ति करतें, किंवा योजना करतें. ( **मम** ) माझी ( **योनिः** ) प्रकटता ( **अप्सु** ) व्यापक बुद्धि व व्यापक कर्में यांत आहे. तसेंच ( **अंतःसमुद्रे** ) सर्व लोकांनीं एकत्र जमून आपला उत्कर्ष होण्यासाठीं जी चळवळ केली जाते तिला "समुद्र" असें म्हणतात, या समुद्रामध्यें राष्ट्रीय विचाराचें उत्पत्तिस्थान आहे. ( "अपः" शब्दाचा "कर्म" असा अर्थ निघं० २।१॥ मध्यें दिला आहे. "समुद्र" यांत तीन दलें आहेत. "सम्+उत्+द्रु" यापैकीं "सम्" चा अर्थ "एकीभाव होणें" असा निरु० १।३॥ मध्यें दिला आहे. "उद्"चा अर्थ "उत्कर्ष" व "द्रु" धातूचा अर्थ "गति–चळवळ" हा प्रसिद्ध आहे. हे तीनहि अर्थ एकत्र केले असतां "समुद्र" शब्दाचा अर्थ ध्यानांत येईल. ) अर्थात् राष्ट्रीय विचारांचा प्रभाव संकुचित विचारसरणींत नसून व्यापक विचारांत आहे. संकुचित व भेदजनक कृत्यांनीं उन्नतीचा नाश होतो व व्यापक व ऐक्यवर्धक कृत्यांनीं उन्नतीला जोम येतो. ( **ततः** ) अर्थात् मी ( **विश्वा भुवनानि** ) सर्व भुवनांमध्यें ( **अनु वितिष्ठे** ) आंत प्रवेश करून विशेष प्रकारानें राहतें असा भास होतो. ( **उत** ) आणि मी माझ्या आज्ञे-

प्रमाणें राष्ट्रोन्नति प्राप्त करून घेण्यास प्रवृत्त झालेल्या लोकांना ( अमुं यां ) सुखमय लोकाला ( वर्ष्मणा ) देहानें ( उपस्पृशामि ) स्पर्श करवितें. अर्थात् माझ्या आज्ञेप्रमाणें वागणारांना इहपरलोकीं उत्तम देह प्राप्त होऊन त्यांना साक्षात् राष्ट्रीय सुखाचा अनुभव करून देऊन त्यांच्यांत आनंदीआनंद करून सोडतें.

**भावार्थ**—राष्ट्रामध्यें कर्तृत्वशक्ति वाढूं लागली म्हणजे त्या राष्ट्रांत श्रेष्ठ लोक नायक उत्पन्न होऊं लागतात व ते राष्ट्राची सर्व सत्ता नियंत्रित करतात. व ते सर्वांवर सारखें प्रेम करूं लागतात. व्यापक इच्छा, व्यापक कृत्यें व उत्कर्ष होण्यासाठीं सर्वांनीं जमून करावयाचीं कामें यांमध्यें राष्ट्रीय संघशक्तीची उत्पत्ति असते, एकदां अशा व्यापक इच्छांपासून ती संघशक्ति उत्पन्न झाली म्हणजे मग ती चहूंकडे पसरते, व सर्वांमध्यें आनंदीआनंद करून सोडते.

## अहमेव वात इव प्रवाम्यारभमाणा भुवनानि विश्वा ॥ परो दिवा पर एना पृथिव्यैतावती महिना संबभूव ॥ ८ ॥

**अन्वयः**—विश्वा भुवनानि आरभमाणा अहमेव वात इव प्रवामि । दिवः परः एना पृथिव्या परः अस्मि । महिना एतावती संबभूव ॥

**भाष्यम्**:—**विश्वा भुवनानि** सर्वेषु भुवनेषु ईदृग्विधं उत्तमं कर्म **आरभमाणा** उत्पादयन्ती **अहमेव वात इव प्रवामि** प्रवर्ते । यथा वातः प्रयाति तद्वत् अहं राष्ट्री सर्वेषां जनानां उत्साहं वर्धयित्री अप्रतिहतगतिका भवामि । **दिवः परः** परमाकाशस्य परस्तात् दिव्यमानसशक्तेरपि परस्ताद्वा । तथा च **एना पृथिव्याः परः** अस्याः पृथिव्याः परस्तात् शारीरिकशक्तेरपि परस्ताद् । वर्तमानाहं महती शक्तिरस्मि । साहं राष्ट्री **महिना** स्वमहिम्ना **एतावती** उपास्यानां प्रथमा **संबभूव** सम्यक्—भवामि ॥ ८ ॥

**शब्दार्थः**—( **विश्वा भुवनानि** ) सर्व जगतांतील सर्वलोकांच्या व्यवहारांना ( **आरभमाणा** ) प्रारंभ करून ( **अहमेव** ) मीच—( **वातं इव** ) वाऱ्याप्रमाणें ( **प्रवामि** ) त्यांचे व्यवहार चालू ठेवतें जशी वाऱ्याला गति मिळून तो आपलें काम करतो त्याचप्रमाणें माझें काम एकदां सुरू झालें म्हणजेहि लोकांचा ( जीवात्म्यांचा ) उत्साह वाढून माझी गति अप्रतिहत होते. ( **दिवः परः** ) या आकाशापेक्षां किंवा या दिव्य मानसशक्तीपेक्षां व त्याचप्रमाणें ( **एना पृथिव्याः परः** ) या पृथिवीपेक्षां किंवा या पार्थिव शरीराच्या शक्तीपेक्षांहि मी फार मोठी शक्ति आहें. अशी अस-

णारी मी ( राष्ट्रशक्ति-आत्मशक्ति ) स्वतःच्या ( **महिना** ) महिम्यानें ( **एता-वती** ) अशी राष्ट्राची मुख्य उपास्य देवता ( **संबभूव** ) झाली आहे.

**भावार्थ**—राष्ट्रशक्तीच्या योगानें अनेक तऱ्हांनीं सर्वत्र काम सुरू होतें व झंझा-वाताची जशी गति पसरत जाते व वेग वाढत जातो तसा या शक्तीचाहि वेग वाढतो व व्याप्तीहि वाढते. शारीरिक व मानसिक शक्तींपेक्षांहि या राष्ट्रशक्तीचा जोर जास्त आहे. आत्मिक बलानें उत्पन्न झालेली अशी ही राष्ट्रशक्ति आहे. म्हणूनच हिला सर्वांत मुख्य असें विद्वान् लोक समजतात

---

## राष्ट्रीसूक्तांत आलेल्या कांहीं शब्दांचें स्पष्टीकरण.

**( १ ) राष्ट्री**—या शब्दामध्यें " राजृ दीप्तौ " हा धातू आहे. " राज् " या धातूचा अर्थ " प्रकाशणें, चकचकणें " असा अर्थ आहे. या धातूवरून " राष्ट्र " शब्द बनतो व त्याचा अर्थ " **राजते तत् राष्ट्रं** " " जें प्रकाशतें तें राष्ट्र होय " असा होतो. अर्थात् ज्या देशाची कीर्ति चहूंकडे पसरत असते, ज्याचें तेज इतर देशानां दिपवून टाकीत असतें त्यालाच राष्ट्र असें म्हणतां येतें, इतरांना नाहीं. अर्थात् " राष्ट्र " ही पदवी त्या देशांतील लोक उन्नतावस्थेंत असतांनांच त्यांना मिळते. व ती मिळवावयाला विलक्षण कामगिरी करावी लागते. हा अर्थ लक्ष्यांत आला म्हणजे " राष्ट्री " शब्दाचा अर्थ समजण्यास अडचण पडणार नाहीं. " **राष्ट्रस्य बीजभूता शक्तिः राष्ट्री । अथवा राष्ट्रं उत्पत्तिस्थानत्वेन अस्ति अस्यां इति राष्ट्री ।** " अर्थात् " ज्या शक्तीच्या योगानें एका देशाला राष्ट्र ही दिव्य पदवी मिळते किंवा ज्या शक्तीमध्यें देशाला राष्ट्र बनविण्याचें सामर्थ्य आहे तिला राष्ट्री असें म्हणतात. " हिच्यामध्यें जरी अनेक प्रकारच्या शक्तींचा समावेश होत असला तथापि खुणेसाठीं हिला आपण विचारऐक्यानें बनलेली " **राष्ट्रीयसंघ-शक्ति** " असें म्हणूं.

**( २ ) वसुः**—या शब्दामध्यें " वस निवासे, " " वस आच्छादने " हे धातू आहेत. यांचा अर्थ " **वसन्ति ब्रह्मचर्यं, वसन्ति तेषां शरीरे धातवः, वसति तत्र परं तेजः, आच्छादयन्ति तमः ज्ञानेन, वासयन्ति वा लोकान् ते** " असा होतो; अर्थात् " पूर्ण ब्रह्मचर्य धारण करून शरीरांतील सप्त धातूंला स्थिर करणारे, तेजस्वी, ज्ञानानें अज्ञानांधकाराचा नाश करणारे, लोकांचें रक्षण करणारे व अग्न्यादिक आठ वसु " यांना " वसु " असें म्हणतात. निघंटुमध्यें ( अ. २।१० ) " वसु " या शब्दाचा " धन " असा अर्थ सांगितला आहे व निघंटु ( अ. १।७ ) मध्यें " रात्रि " असा अर्थ दिला आहे. छांदोग्य उपनिषदा

( प्र. ३।१६ ) प्रमाणें चोवीस वर्षांचें जो ब्रह्मचर्य धारण करतो त्याला " वसु " हि संज्ञा होते. ही निकृष्ट ब्रह्मचर्याची मर्यादा आहे. शतपथ ब्राह्मणांत वसु आठ आहेत असें सांगितलें आहे. पहा–" **कतमे वसव इति । अग्निश्च पृथिवीच वायुश्चान्तरिक्षं चादित्यश्च द्यौश्च चंद्रमाच नक्षत्राणि चैते वसवः । एतेषु हीद ँ सर्वं वसुहितं०** ॥ शतपथ, १४।५॥

( ३ ) **रुद्रः**—या शब्दामध्यें " रुद् " धातू " रडणें " या अर्थी आहे, " **रोदयतीति रुद्रः ।** " " जो रडवितो तो रुद्र " होय. अर्थात् " पापी, दुष्ट. हिंसक, क्रूर, नास्तिक, परस्वापहारक इत्यादि दुष्ट लोकांना यथायोग्य शासन करून त्यांना रडविण्यास लावणारा तो रुद्र समजावा," असा पुष्कळ ग्रंथकारांचा रुद्र शब्दाबद्दल आशय आहे. याचप्रमाणें " रु शब्दे " व " रु गतिरेषणयोः " या धातूंवरून ' क्विप् " प्रत्यय करून " रुत् " शब्द बनतो व त्यावरून " मत्वर्थीय र " करून " रुद+र=रुद्रः " असाहि हा शब्द बनविण्याचा प्रकार आहे. या तऱ्हेनें याचा अर्थ " वर्णन करणारा, वाङ्मयाचें परिशीलन करणारा, विज्ञानी, लोकांत गति अर्थात् चळवळ करणारा, दुष्टांचा ( रेषण ) नाश करणारा " इत्यादि प्रकारानें होतो. निघंटु ( अ. ३।१६ ) मध्यें "स्तवन करणारा" या अर्थी हा शब्द दिला आहे. छांदोग्यउपनिषदा ( प्र० ३।१६ ) प्रमाणें चवेचाळीस वर्षेपर्यंत ब्रह्मचर्य धारण करून राहणाऱ्या विद्यार्थ्यांना " रुद्र " ही संज्ञा होते. कित्येक लोक ही ब्रह्मचर्याची वर्षमर्यादा छत्तीस वर्षांची आहे असें समजतात. शतपथामध्यें प्राणांला " रुद्र " असें म्हणतात म्हणून सांगितलें आहे. पहा " **कतमे रुद्र इति । दशेमे पुरुषे प्राणा आत्मैका दशस्ते०** ॥ शतपथब्रा. १४।५॥ "

( ४ ) **आदित्यः**—" आ " उपसर्गपूर्वक " दा दाने " किंवा " दीप् दीप्तौ " या धातूवरून हा शब्द बनतो. याचा अर्थ " चहूंकडे प्रकाश पाडणें किंवा स्वीकार करणें " असा मूळचा आहे. किरणांच्या योगानें पाण्याला वर खेंचतो म्हणून सूर्याला आदित्य म्हणतात, ज्ञानाचा लोकांच्या अंतःकरणांत प्रकाश पाडतो म्हणून पूर्ण विद्वानाला आदित्य म्हणतात. याच अर्थी छांदोग्यउपनिषदा ( प्र० ३।१६ ) मध्यें अठ्ठेचाळीस वर्षांचें ब्रह्मचर्य पालन करून पूर्ण विद्वान् होणारास " आदित्य " ही संज्ञा होते असें सांगितलें आहे. शतपथब्राह्मणांत बारा महिन्यांला " आदित्य " संज्ञा आहे असें सांगितलें आहे कारण ते महिने मनुष्यांचें आयुष्य घेऊन जातात. पहाः — " **कतम आदित्या इति । द्वादशमासाः संवत्सरस्यैत आदित्या एते हीद ँ सर्वमाददानायन्ति०** ॥ शतपथ. १४।५ ॥ "

(५) देवः—यामध्यें “ दिव् ” धातू आहे. त्याचे अर्थ “ दिव्=क्रीडा–विजिगीषा–व्यवहार–द्युति–स्तुति–मोद–मद–स्वप्न–कान्ति–गतिषु ” इतके आहेत. त्या अनुरोधानें “ देव ” शब्दाचे अनेक अर्थ होतात ते वाचकांनीं धात्वर्थावरून जाणावे. निरुक्त ( अ० ७।१५ ) मध्यें याचा अर्थ “ **देवो दानाद्वा दीपनाद्वा द्योतनाद्वा द्युस्थानो वा भवतीति** ” असा दिला आहे. त्यावरून “ दातृत्व, प्रकाश, दर्शकपणा, द्युस्थानीं किंवा आकाशांत निवास ” ज्याचा असतो त्याला देव असें समजावयाचें. शतपथ ब्राह्मणामध्यें ( कां० ३।७ ) मध्यें “ **विद्वाꣳसो हि देवाः ।** ” असें सांगितलें आहे त्यावरून “ विद्वत्ता ” हें देवत्वाचें चिन्ह होतें. तसेंच त्याच ग्रंथांत ( १।१।१।४।५ ) मध्यें “ **सत्यं देवा अनृतं मनुष्याः ।** ” असें सांगितलें आहे, त्यावरून “ सत्यनिष्ठता ” हें देवत्वाचें आणखी एक चिन्ह आहे असें ठरतें.

(६) **मित्रः**—याचा अर्थ “ सूर्य, वायू, स्नेही ” इत्यादि प्रकारचे प्रसिद्ध आहेत. “ **मिनाति मान्यं करोतीति मित्रः** ” या अर्थाप्रमाणें हित करणाराला “ मित्र ” असें म्हणतां येतें. या शब्दांत “ मा माने ” हा धातु आहे. यावरून याचा अर्थ “ मापणारा, मोजणारा, आपल्या स्नेह्याचें वर्तन मोजणारा, ” इत्यादि प्रकारानें अर्थ होतात. “ **प्रमीतात् मरणात् त्रायते इति मित्रः** ” मरणापासून किंवा दुःखापासून रक्षण करणाऱ्याला “ मित्र ” असें म्हणतात. शिवाय “ मि ” या धातूचे अर्थ “ क्षेपणे, सेचने, स्नेहने ” असे आहेत. त्या अर्थामुळेंहि “ मित्र ” शब्दाचे आणखी पुष्कळ अर्थ होतात ते सहज समजण्यासारखे आहेत.

(७) **वरुणः**—यांत “ वृञ् वरणे ” हा धातू आहे. “ **व्रियते इति वरुणः** ” सर्वांनीं स्वीकारला जातो तो वरुण होय. वरुण हें एका वायूचेंहि नांव आहे.

(८) **सोमः**—यांत “ स + उमा ” असे दोन शब्द आहेत. उमा शब्दाचा अर्थ “ विद्या किंवा ब्रह्मविद्या ” असा होतो. त्या विद्येनें युक्त जो असतो त्याला “ सोम ” असें म्हणतात. त्याचा लौकिकांत “ चंद्र ” असा अर्थ होतो. यामध्यें “ षु प्रसवैश्वर्ययोः, ” “ षुञ् अभिषवे, ” हे धातु आहेत, यांवरून याचा अर्थ “ सुखें उत्पन्न करणारा, ऐश्वर्याचा हेतु ” इत्यादि प्रकारें होतो.

(९) **पिताः**—यामध्यें “ पा रक्षणे ” हा धातू आहे. त्यावरून त्याचा मूळचा अर्थ “ रक्षक ” असा आहे. रूढीमध्यें त्याचाच अथ “ जनक ” असा समजतात.

(१०) **अपः**—यामध्यें “ आप्लृ व्याप्तौ ” हा धातू आहे “ व्यापणं ” हा त्याचा मूळचा अर्थ. रूढीमध्यें “ उदक ” असा त्याचा अर्थ झाला आहे. निघंटुमध्यें “ अपः ” शब्दाचे दोन अर्थ दिले आहेत. ( अ० १।१२ ) मध्यें “ उदक ” असा व ( अ० २।१ ) मध्यें “ कर्म ” असा दिला आहे. सायणाचार्यांनीं आपल्या भाष्यांत “ व्यापक बुद्धि ” असा अर्थ केला आहे.

(११) समुद्रः—यांत तीन दलें आहेत, "सम् + उत् + द्रु" या तीन दलांचा अनुक्रमें अर्थ "एक होणें + उत्कर्ष + गति किंवा चळवळ" असे आहेत. या तीन अर्थांचें एकीकरण जें होतें तोच "समुद्र" शब्दाचा अर्थ. रूढीमध्यें "जल-निधि" असा अर्थ होतो.

## राष्ट्रीसूक्तांतील उपदेशाचें आंदोलन.

हल्लींच्या विचारपरंपरेप्रमाणें पाहिलें असतां असें वाटतें कीं, मनुष्य जसजसा सुधारत जातो, जसजसें तो आपलें ज्ञान वाढवितो तसतशी त्याच्यावर कर्तव्याची जबाबदारी जास्त जास्त येऊन पडते. ज्याप्रमाणें मनुष्य टेंकडीवर चढूं लागला असतां त्याचें दृश्य जास्त जास्त विस्तीर्ण होऊं लागते, त्याचप्रमाणें मनुष्य ज्ञानी होऊं लागला असतांहि एकापेक्षां एक व्यापक कर्तव्यें त्याच्या समोर येऊन उभीं राहूं लागतात. मनुष्य अगदीं अज्ञानी असतांहि स्वतःचें कसें तरी संरक्षण करावें, किंवा फार झालें तर आपल्या बायकापोरांचा कसा तरी संभाळ करावा इतकेंच कायतें त्याला वाटत असतें, पण तो थोडासा जास्त ज्ञानी झाला व त्याला आपणाप्रमाणेंच आणखी इतर मनुष्यें आहेत व त्यांनांहि सुखदुःखें आहेत हें कळूं लागलें म्हणजे स्वतःचें संरक्षण किंवा आपल्या कुटुंबाचें संरक्षण करण्याचे मार्ग तो प्रामाणिकपणाच्या बाजूनें आक्रमूं लागतो. या स्थितींतून तो जसजसा वर येत जाईल तसतशीं आपल्या कुलासंबंधानें, जातीसंबंधानें, गांव किंवा प्रांत यांसंबंधानें एकापेक्षां एक महत्त्वाचीं कर्तव्यें, तो तीं आपलींच कर्तव्यें आहेत असें समजून करूं लागतो. या स्थितींतून वर आल्यानंतर त्याच्यापुढें देशाची कल्पना येऊन उभी राहते व देशासाठीं आपलीं कर्तव्यें काय आहेत तीं तो पहातो व तीं आपल्या हातून पूर्णपणें तडीस जावीं असें इच्छितो. ज्या अज्ञदशेंत असतांना तो आपल्या किंवा कुटुंबाच्या हितासाठीं राष्ट्राच्या हानिलाभांची पर्वा करीत नसे तोच गृहस्थ या सज्ञदशेमध्यें राष्ट्रहित साधतेवेळीं मरण्यास एका पायावर तयार होतो, त्यावेळीं त्याला आपल्या बायकापोरांचें स्मरण होत नाहीं, आपल्या समोर असलेल्या कर्तव्याशीं त्याची अशी तन्मयता झालेली असते कीं, शरीरावर होणाऱ्या जखमांनीं किंवा मरणकाळच्या वेदनांनीहि त्याचें चित्त कर्तव्यापासून त्याला ढळवित नाहीं. हा काय चमत्कार आहे बरें? मनुष्य एका स्थितीमध्यें स्वार्थासाठीं परार्थाचा चुराडा करतो व तोच दुसऱ्या स्थितीमध्यें परोपकारासाठीं स्वतःलाहि विसरून जातो. या देशाच्या कल्पनेच्याहि पुढची स्थिति विश्वकुटुंबकत्वाची होय. पूर्वी जें त्याचें देहामध्यें ममत्व होतें, त्याची व्याप्ति वाढत वाढत आतां विश्वापर्यंत आलेली असते; यावेळीं त्याच्या मनांत आपपर भाव नसतो, प्राणिमात्राचें कल्याण हाच विचार त्याच्या

**मनुष्यांच्या कर्तव्यांचा विस्तार.**

**देशाची कल्पना.**

**विश्वकुटुंबकत्वाची स्थिति.**

डोक्यांत असतो. पण या स्थितीमध्यें फारच थोड्यांचा अंतर्भाव होतो. साधारणतः राष्ट्रीयऐक्यत्वाच्या कल्पनेपर्यंत पुष्कळांना जातां येतें व तेथील आपलीं कर्तव्येंहि पुष्कळांना बजावतां येतात. म्हणून सध्यांच्या मानवी सुधारणेमध्यें हीच अखेरची पायरी आहे असें म्हणणें गैरवाजवी होणार नाहीं.

वेदामध्यें सर्व दर्ज्यांच्या लोकांची सुधारणा कशी होईल याचे मार्ग सांगितलेले आहेत, व्यक्तिशः उन्नति, सामाजिक उन्नति, जातीची ( वर्णाची ) उन्नति, राष्ट्राची उन्नति व परंपरेनें सर्वांची सुधारणा या सर्व विषयांची चर्चा वेदामध्यें पूर्णपणें केलेली आहे. वेद हें अज्ञानी लोकांनीं लिहून ठेवलेलें चोपडें अशी समजूत धार्मिक लोकांनीं तरी आपली करून घेऊं नये. वेदामध्यें मनुष्यमात्राची उन्नति होण्याचे सर्व मार्ग आहेत, पण ते धार्मिक लोकांनीं पाहिले पाहिजेत. असो. आज या प्रसंगीं आपणास वेदांतील राष्ट्रीय सूक्ताचा विचार करावयाचा आहे. राष्ट्रसंबंधीं वेदामध्यें अनेक मंत्र आहेत, पण स्वतंत्र सूक्त असें हें आज आपणापुढें आहे. या सूक्तांतील आशय पाहण्यापूर्वी वर्णाश्रमधर्माचें तत्त्वरूपानें दिग्दर्शन करण्याची आवश्यकता आहे.

**वैदिक उपदेशाची व्याप्ति.**

चार वर्ण, चार आश्रम व त्यांचीं कर्तव्यें हाच आपल्या वैदिक धर्मातील महत्त्वाचा भाग होय. यांतील कर्तव्यें नीटरीतीनें केलीं असतां व्यक्तिशः व सामाजिक उन्नति सहज व जोरानें होते. ही कशी होते तें पाहण्यासाठीं आपण वर्णधर्माचा थोडासा विचार करूं. शूद्र, वैश्य, क्षत्रिय व ब्राह्मण ही उन्नतीची परंपरा आहे. शूद्र हा केवळ अज्ञानी मनुष्य, म्हणून तीन वर्णांतील मनुष्यांची परिचर्या हेंच काय तें त्याचें या स्थितींतील कर्तव्य असतें. याणें तीनहि उच्च वर्णातील मनुष्य काय काय कर्तव्यें कशीं करतात, त्यांचा थोरपणा त्यांना कशानें प्राप्त झाला इत्यादि गोष्टी केवळ त्यांच्या सान्निध्यानें जाणाव-याच्या असतात. या रीतीनें तीनहि वर्णीयांच्या सहवासानें शूद्रामध्यें ज्ञानाचा अंकुर उत्पन्न होतो, पण तो वाढलेला नसतो. याच्या पुढची पायरी वैश्याची होय. यामध्यें ज्ञानाच्या अंकुराची थोडीशी वाढ होते. शेती, गोरक्षण व व्यापार हीं या स्थिती-मधील कर्तव्यें होत. या स्थितीमध्यें याची प्रवृत्ति "देण्यापेक्षां घेणें जास्त असावें, आपण जेवढें दुसऱ्याला देऊं त्यापेक्षां उलट त्याणें आपणास जास्त द्यावें" ही प्रवृत्ति असते. जरी यांत स्वार्थ आहे तरी ही ज्ञानविकासाची प्राथमिक स्थिति असल्यामुळें शूद्रत्वापेक्षां पुष्कळ पटीनें जास्त थोर आहे. शूद्रत्वामध्यें बालकाप्रमाणें परावलंबी-पणाच जास्त असतो, पण वैश्याच्या स्थितीमध्यें स्वावलंबन सुरू होतें. हीच तेथें ज्ञान असल्याची खूण आहे. क्षत्रिय ही त्याच्या पुढची पायरी होय. या स्थितीमध्यें विद्यार्जन, लोकरक्षण हीं कर्तव्यें असतात. या स्थितींतील मनुष्य जनतेच्या रक्षणासाठीं मर-

**वर्णाश्रमधर्मानें उन्नति कशी होते?**

ण्यासहि तयार असतो; प्राण हातावर घेऊन, लोकोपकारासाठीं चाललेल्या स्वाहाकारामध्यें, त्यांची वाटेल तेव्हां आहुति देण्यास तो सदासर्वदा तयार असतो. खऱ्या क्षत्रियाला बायकापोरें, जमीनजुमला, धनदौलत या पदार्थांची पर्वा नसते, त्याला लोकाचें संरक्षण करणें हेंच आपले कर्तव्य दिसत असते. या स्थितीमध्ये शूद्रांतील परावलंबीपणा, अज्ञान व कर्तव्यशून्यता यांचा नाश झालेला असतो व वैश्यांतील स्वार्थाचें मापहि बरेंच कमी झालेलें असते; पण त्याचा पुरा बीमोड झालेला नसतो. "लढाईत मेलों तर स्वर्ग मिळून नांवलौकिक होईल व जगलों तर पृथिवीचें अखड राज्य मिळेल" ही इच्छा त्याच्या हृदयात असते व ती या स्थितीत असण्याची आवश्यकताहि आहेच. याच्या पुढील पायरी ब्राह्मणाची होय. या ठिकाणी ज्ञानाची परमावधि झालेली असते, स्वार्थाची पूर्णाहुति केव्हांच होऊन चुकलेली असते. क्षत्रियात नावलौकिकाच्या मोबदल्याची तरी इच्छा असते, पण या स्थितींत तीहि नसते. लोकात ज्ञानाचा प्रसार व्हावा, त्यांना स्वतःची स्थिति समजावी, त्यांणीं आत्मोन्नति करून घ्यावी, अधर्माचा नाश होऊन धर्मजागृति सर्वत्र व्हावी याच कायत्या इच्छा या स्थितीत असतात. अर्थात् परावलंबीपणापासून पूर्ण स्वावलंबन, अज्ञानापासून पूर्ण ज्ञानीपणा व स्वार्थापासून पूर्ण परोपकारीपणा ह तत्त्व चातुर्वर्ण्याच्या धर्मनियमात व्यापून आहे हे आता निराळे सागण्याची आवश्यकता नाही.

जें तत्त्व वर्णधर्मीत आहे तेच आश्रमधर्मांतहि आहे. प्रथमतः पहिली ब्रह्मचर्याची अवस्था होय. चोवीस वर्षांपासून तों अठ्ठेचाळीस वर्षांपर्यंत याचा काल ज्याच्या

आश्रमधर्म.

त्याच्या इच्छेनुरूप विशेष नियमानीं पाळावयाचा असतो. कोणी भीष्मपितामहासारखे आजन्म ब्रह्मचर्यात राहतात ही गोष्ट निराळी, पण कमींतकमी चोवीस वर्षेपर्यंत तरी ब्रह्मचर्य प्रत्येकान पाळलेंच पाहिजे चोवीस वर्षांच ब्रह्मचर्य पाळले गेलें, म्हणजे मग इच्छा असेल त्याप्रमाणे विशेष अध्ययन करण्यासाठीं छत्तीस (किंवा चवेचाळीस) व अठ्ठेचाळीस वर्षांपर्यंत ब्रह्मचर्य पाळावें. या ब्रह्मचर्याच्या कालामध्यें गुरूची आज्ञा पालन करणे, विद्या शिकणे, शरीराचे बल वाढविणें इत्यादि कर्तव्यें करावयाचीं असतात. बालपणाची स्थिति पूर्ण परावलबनाची असते व ही ब्रह्मचर्यावस्था त्याहून थोडी कमी, पण परावलबनाचीच असते. याच्या पुढची स्थिति गृहस्थाश्रमाची होय. ब्रह्मचर्यात ममत्व फक्त स्वतःवरच असतें, पण या स्थितींत ते विशेषतः कुटुंबावर व सामान्यतः समाज व देश यांवरहि जाऊन बसतें. धनदौलत मिळवून कुटुंबाच उत्तम रीतीने संरक्षण करावें व गृहस्थाश्रमांतील इतर कृत्यें करावीत याकडे गृहस्थाचे लक्ष्य असते; नंतर वानप्रस्थाश्रमांतील स्थिति येते. यामध्यें आपल्या कुटुबावरचे ममत्व जाऊन त्याची व्याप्ति वाढते. ब्रह्मचर्यात मिळविलेल्या विद्येचा दुसऱ्या विद्यार्थ्यास उपदेश करून

त्यांचीं मनें सुसंस्कृत करावीं व आपण स्वतः तत्त्वज्ञानाचा निदिध्यास करावा हींच मुख्य कर्तव्यें या आश्रमांत असतात. याच्या पुढें पूर्ण स्वार्थत्यागाची स्थिति येते. "वसुधैव कुटुंबकम्" हें तत्त्व यावेळीं अमलांत येतें व तो मनुष्य संन्यस्त होऊन परोपकारासाठींच जें जें काय करावयाचें तें करीत असतो. या आश्रमव्यवस्थेचा वर्णव्यवस्थेशीं कसा संबंध आहे हें पाहिलें असतां व्यक्तिशः व सामाजिक उन्नति कशी होते तें तेव्हांच समजेल.

या वर्णाश्रमधर्मांच्या व्यवस्थेचा विचार केला असतां आपणास असें आढळून येईल कीं, या व्यवस्थेच्या योगानें मनुष्यें व राष्ट्रें अज्ञानांतून ज्ञानामध्यें, पारतंत्र्यांतून स्वतंत्रतेंत, परावलंबीपणापासून स्वावलंबनामध्यें, बधापासून मुक्तीमध्यें प्रवेश करतील व तेथील दिव्य अमृतानंदाचा उपभोग घेतील यांत शंका नाहीं. असो. येथवर

**राष्ट्रीसूक्त.**

वर्णाश्रमधर्मतत्त्वांचें थोडेंसें दिग्दर्शन केल्यानंतर आतां प्रकृत विषयाकडे वळण्यास हरकत नाही. या राष्ट्रीसूक्तासंबंधानें सध्यां आपणास विचार कर्तव्य आहे. या सूक्तांत प्रायः राष्ट्रोन्नतीला काय काय साधनें लागतात व त्यांचा कसा उपयोग करावयाचा, कोणत्या प्रकारच्या लोकांचें सहाय्य विशेष होतें. एकदां हें वारें लोकांमध्यें शिरलें म्हणजे तें कसें भडकत जातें, राष्ट्रावर राष्ट्रनियामकाची कशी योजना होते, कोण नियंता होऊं शकतो वगैरे गोष्टींचें सविस्तर वर्णन या सूक्तांत आहे. करमणूकीच्या चुटक्यांप्रमाणें एकदां वाचून यांतील गर्भितार्थ लक्ष्यांत येणार नाहीं ही गोष्ट अगदीं निर्विवाद आहे. प्रथमतः यौगिक ( धात्वर्थाच्या ) दृष्टीनें मंत्रार्थ पाहून मग त्यावर शांतपणें विचार केला असतां मंत्रांतील आशय स्पष्टपणें लक्ष्यांत येतो, हें विचारी वाचकांस सांगण्याची अपेक्षा नाहीं.

मंत्रांतील उपदेशाचें विवरण करण्यापूर्वी सूत्राच्या रचनेसंबंधानें थोडासा विचार करणें आवश्यक आहे. या सूक्ताची ऋषिका वाक् नामक आहे व आम्भृणीवाक्

**सूक्ताचा ऋषि व देवता.**

ही देवता आहे. जिच्या योगानें भरण, पोषण व उन्नति होऊं शकते त्या विद्येला आम्भृणीवाक् असें म्हणतात. हीच वेदविद्या होय. सर्व मनुष्यांच्या उन्नतींचे मार्ग व भौतिक, आत्मिक व दैविक सर्व विद्या या वेदांत असल्यामुळें त्यांचें मुख्यत्व स्वयंसिद्ध आहे. या सूक्तांत आठ मंत्र आहेत. पहिल्या दोन मंत्रांत "अहं" शब्द नुसताच आलेला आहे व तो आम्भृणीवाक् या देवतेचा द्योतक आहे. तिसऱ्या मंत्रांत "अहं" शब्दाच्यापुढें जोडूनच "राष्ट्री" शब्द आलेला आहे. या व्यवस्थेकडे पाहिलें असतां पहिल्या दोन मंत्रांत सर्व उन्नतींला अत्यावश्यक असणाऱ्या विद्येची प्रशंसा करून मग पुढील सहा मंत्रांत राष्ट्रोन्नतिकारक गुणांचें वर्णन केलें आहे असें स्पष्ट दिसतें. वेद स्वतः प्रमाण असल्यामुळें व त्यांतील उपदेश निर्भ्रांत असल्यामुळें प्रत्येक

मंत्र हा स्वतंत्र अर्थप्रवक्ता ऋषीच आहे असें निरुक्तकार समजतात. याप्रमाणें पाहतां या सूक्तांतील आठ मंत्र हे अर्थाचें आविष्करण करणारे आठ ऋषीच होत. व " **सर्वांची उन्नति करणारी विद्या** ( आम्भृणी वाक् ) " हा त्यांचा प्रतिपाद्य विषय आहे. यांतील प्रतिपादनाने कसें जनहित साधतें हें त्यांचें परिशीलन करणाराला समजण्यासारखें आहे. ऋषि व देवता यांचा हा संबंध लक्ष्यांत आला म्हणजे पुढील विवरण समजण्यास ठीक पडेल. मनुष्याची काय व इतर प्राण्यांची काय सुखप्राप्तीसाठीच सर्व धडपड असते. सामान्य सुखापासून तों आत्यंतिक मोक्षसुखापर्यंत जो आनंदभोग आहे तो मिळण्याचीं साधनें अज्ञानी जीवाला माहीत असणें अशक्य आहे. जीव अनुभवानें शहाणा होतो व आलेल्या शहाणपणानें पुढे सावध राहतो हें बरें पण बिनधोक मार्गक्रमण करण्यास त्याला दुसऱ्याची साहाय्यता पाहिजेच परमेश्वर हा सर्वज्ञ आहे व तो जीवांचा सहाय्यकर्ता आहे असें आपलीं सर्व शास्त्रें एकमतानें बोलत आहेत. म्हणून सुखाची इच्छा करणारानें परमेश्वरावर दृढनिश्चय ठेवावा हेंच त्यास उचित आहे परमेश्वरावर दृढनिश्चय ठेवणें व त्याच्या वेदाज्ञेप्रमाणें चालणें हेंच खऱ्या उन्नतीचें साधन आहे. व्यक्तीची उन्नति असो किंवा राष्ट्राची उन्नति असो ती साधण्याचे उपाय वेदांमध्यें निश्चयात्मक रीतीनें सांगितलेले आहेत. तशा अनेक सूक्तांपैकीच राष्ट्रीसूक्त हें राष्ट्रोन्नतीच्या उपायांचें प्रदर्शन करणारें सूक्त आहे.

**मोक्षसुख व राष्ट्रीयसुख प्राप्त होण्यास परमेश्वराच्या उपदेशाची आवश्यकता.**

या सूक्तांत विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट ही की, यांत " अस्मत् ( अहं—मी ) " या प्रथमपुरुषाचा प्रयोग केलेला आहे. निरुक्तामध्यें असें सांगितलें आहे कीं, ज्या ज्या मंत्रांत प्रथमपुरुषी प्रयोग असेल तेथें तेथें आध्यात्मिक अर्थ मुख्य असतो. समष्टिव्यष्टीनें न्यूनाधिक्य कल्पून इतर अर्थ जाणावयाचे असतात. शुद्ध आध्यात्मिक अर्थ या विवरणाच्या शेवटीं दाखविण्यांत येईल. येथें इतकेंच सांगावयाचें कीं यांत प्रथमपुरुषाचा प्रयोग असल्याने यांतील उपदेशामध्यें विशेष महत्त्व आहे; कारण यांत परमात्म्याशीं साक्षात्संबंध दाखविणारें " अहं " हें पद आहे. या मंत्रांत वाक् ही देवता व वाक् हीच ऋषिका आहे, हाहि संबंध येथें लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे.

**अस्मत् शब्दाचा प्रयोग व त्याचें महत्त्व.**

राष्ट्राचा एक जीव होण्यास त्यांत **एक भाषा** असलीच पाहिजे हे उघड आहे. या सूक्तांतील पहिल्या दोन मंत्रांत हाच मुद्दा विशेष रीतीनें सांगितला आहे. सर्व लोकांत या भाषेच्या द्वाराने एकविचाराचें वारें शिरून अनेक अद्भुत कार्यें त्यांच्याकडून होतात व त्यायोगानें त्यांची उन्नति होते. तात्पर्य

**राष्ट्रोन्नतीला एका भाषेची आवश्यकता.**

इतकेंच कीं राष्ट्रोन्नतीला एका भाषेची आवश्यकता आहे. वेदवाणीपासून उत्पन्न झालेल्या अनेक भाषा आहेत, पण त्यांतल्या त्यांत औरस **संस्कृतभाषा** ही एकच आहे जर भाषेच्या शुद्धतेकडे लक्ष्य देऊन देशाची भाषा एक करावयाची असेल तर ती संस्कृतच होऊं शकेल, पण इतर अडचणींमुळें जर कांहीं प्रत्यवाय असले तरी कोणती तरी एक भाषा राष्ट्रीयभाषा असली पाहिजे यांत शंका नाहीं.

जशी राष्ट्रोन्नतीला एकभाषेची आवश्यकता आहे त्याप्रमाणें ज्ञानाचीहि आवश्यकता आहे. या ज्ञानांत आधिभौतिक, आध्यात्मिक व आधिदैविक या तीनहि ज्ञानांचा समावेश होतो. या सूक्तामध्यें वसु, रुद्र, आदित्य व विश्वेदेव असे चार ज्ञानीलोकांचे भेद केले आहेत. ज्यांना अग्नि, पृथिवी, वायु, अंतरिक्ष, आदित्य, द्यौः, चंद्र व नक्षत्रें या आठ वसूंचें ज्ञान असतें त्यांना वसु ही संज्ञा होते. जगताला या आठ वसूंचा आधार आहे. तो कसा आहे, या अग्न्यादि पदार्थांत कायकाय गुणधर्म आहेत व उन्नतीच्या कामीं त्यांचा कसा उपयोग होऊं शकेल हें जाणणारे ते वसु होत. वसूंमध्यें भौतिक ज्ञानाची परमावधि असते. रुद्र हे यांच्या पुढचे ज्ञानी होत. ज्यांना वरील आठ वसूंचें ज्ञान आहे व पंचप्राण, पंच उपप्राण व एक आत्मतत्त्व या अकरा रुद्रांचेंहि ज्ञान आहे त्यांची रुद्र ही पदवी होय. या प्राणांपासून जगतांत काय काय कामें होतात, त्यांचा व इतर जड पदार्थसमूहाचा कसा व किती संबंध आहे तें यांना समजलेलें असतें. या सर्वांला गति देणारी व प्रकाशमान् जी शक्ति आहे ती आदित्यशक्ति आहे हिचे बारा भेद आहेत या बारांलाहि जे जाणतात त्या ज्ञान्यांला आदित्य असे म्हणतात. या सर्व पदार्थांचें एकीकरण ज्या प्रचंड आत्मशक्तीनें केलेलें असतें तिला जे जाणतात ते विश्वेदेव होत. या चार प्रकारच्या ज्ञानी माणसांकडून सर्व प्रकारच्या मनुष्यांचें कल्याण होऊं शकतें म्हणून ज्याज्या मानानें या विद्वानांमध्यें व अविद्वानां-मध्यें निकट संबंध असेल त्या मानानें त्या जनतेचा उद्धार होऊं शकतो. याप्रमाणे सामान्य विवेचन झालें, आतां मंत्रांतील उपदेशाचा विचार करावयाचा.

**ज्ञानाची आवश्यकता.**

या सूक्तांतील पहिला मंत्र पाहिला असतां राष्ट्रोन्नतीला कोणत्या प्रकारच्या माण-सांची आवश्यकता आहे तें समजतें. "मी उत्तम, मध्यम व कनिष्ठ ब्रह्मचारी व विद्वान् यांच्या द्वारानें कार्यें करतें." हें राष्ट्रशक्तीचें पहिलें विधान आहे. राष्ट्रोन्नतीला ब्रह्मचर्याची काय आवश्यकता आहे हें पहिल्याशिवाय या विधानाची सत्यता आपणास कळणार नाहीं. पहा काम लहान असो अथवा थोर असो तें करण्यास अंगांत व मेंदूंत शक्ति असली पाहिजे. ही शक्ति वीर्याच्या योगानें कायम राहते हा सर्वांचा अनुभव आहे.

**ब्रह्मचारी व विद्वान् लोकांची आवश्यकता.**

वीर्यहीन पुरुष निरुत्साही, निस्तेज, रोगी, अल्पायु, पुरुषार्थहीन व आळशी असे आपण पाहतों. पहिल्या वयामध्यें ज्यांचें वीर्य नष्ट झालें आहे त्यांच्यांत कर्तबगारी दिसून येणें जवळ जवळ अशक्यच आहे असें समजावें. जे वीर्यवान् पुरुष असतात ते उत्साही, सतेज, निरोगी, दीर्घायु, पुरुषार्थी, उद्योगी, धाडशी, धैर्यवान्, बलिष्ठ, बुद्धिवान् व पराक्रमी असे दिसतात. त्यांचें शरीर दिव्य दिसतें, त्यांची वाढ खुंटलेली दिसत नाही व ते नेहेमीं आनंदांत दिसतात. तात्पर्य इतकेंच कीं, उत्तम पुरुषार्थी माणसें होण्याला शरीरांत वीर्य स्थिर झालें पाहिजे, वीर्य स्थिर होण्याला ब्रह्मचर्य पाळलें गेलें पाहिजे व ब्रह्मचर्यानें उत्साहित झालेले जेथें लोक असतील त्याच देशांत राष्ट्रीयशक्तीचें कृत्य सुरू होतें. विषयी, व्यसनी, वीर्यभ्रष्ट, आळशी व अज्ञानी अशा लोकांत राष्ट्रशक्ति प्रौढदशेला येत नाहीं. ब्रह्मचर्याबरोबर विद्याहि पाहिजेच हेंहि येथें विसरतां नये. चांगले वीर्यवान अज्ञानी पुरुष असले तर त्यांत या शक्तीचें तसें कार्य दिसणार नाहीं, जसें सज्ञान व वीर्यवान् पुरुषांत दिसेल. हा मुद्दा फार महत्त्वाचा आहे. तात्पर्य राष्ट्रोन्नतीला जशी ब्रह्मचर्याची आवश्यकता आहे तशीच ती ज्ञानप्रसाराची आहे.

"मित्रावरुणौ, इंद्राग्नी व अश्विनौ या देवता जशा संगतीनें असतात, तशी संगति मी लोकांत करतें" हें पुढचें दर्शन आहे. मित्रावरुणादिकांची जशी भिन्नता होत नाहीं किंवा जसे ते एकरूपानें असतात, तशाच रीतीनें उन्नति इच्छिणाऱ्या लोकांनी राहिलें पाहिजे. या उत्तरार्धांत सृष्टींतील उदाहरणें देऊन उपदेश केला आहे तो फारच महत्त्वाचा आहे जर संघशक्ति नसेल तर ब्रह्मचर्यानें वाढलेली व्यक्तिशः शक्ति काय कामाची व विद्याप्रसारानें वाढलेली बुद्धि तरी काय करणार? जशी व्यक्तिशः शक्तीची वाढ झाली पाहिजे, त्याचप्रमाणें संघशक्तीचीहि वाढ झालीच पाहिजे. नाहींतर कधींहि समाज किंवा राष्ट्र यांची उन्नति होणार नाहीं. तात्पर्य राष्ट्रसंबंधी काम होण्यास ब्रह्मचारी, विद्वान्, वीर्यवान्, धनिक, शूर, मित्र, लोकाग्रणी, ऐश्वर्ययुक्त व चळवळ करणारे असे लोक पाहिजे असतात.

संघशक्ती.

"शत्रूंचा नाश करणाऱ्या विद्वान व सद्गुणी मनुष्याचा मी उत्साह वाढवितें." हें दुसऱ्या मंत्रांतील पहिलें विधान आहे. या ठिकाणीं "विद्वत्ता व शांति वगैरे गुण" हे ज्या मनुष्यांत आहेत तो जर शत्रूंचा नाश करण्याची इच्छा करूं लागला तर त्याला मी उत्साहित करतें, हे विधान पाहण्यासारखें आहे. शत्रूंचा नाश करणाऱ्यामध्यें

विद्वत्ता व सद्गुण यांची काय अवश्यकता आहे तें पाहिलें पाहिजे. आपण पूर्वी पाहिलेंच आहे कीं, अज्ञानदशेमध्यें स्वार्थ असतो व कर्तव्यांची व्याप्तीहि लहान असते; पण सज्ञानदशेमध्यें परोपकार वाढतो व कर्तव्यांची व्याप्तीहि प्रसृत झालेली असते. ही गोष्ट लक्षांत ठेवून आपण वरील विधान पाहिलें पाहिजे. जर अज्ञानी व क्रूर मनुष्य शत्रूंचा नाश करण्याची इच्छा करूं लागेल तर त्याठिकाणीं कांहींतरी स्वार्थाचा हेतु असलाच पाहिजे हें उघड आहे, कारण तो उच्च वातावरणांतील विशाल कल्पनांनी प्रेरित होण्याचा संभव नसतो; पण जर ज्ञानी व सद्गुणी मनुष्य शत्रूंचा नाश करूं इच्छील तर तेथें मात्र लोकोपकार, राष्ट्रहित, इत्यादि उच्च कल्पना असल्याच पाहिजेत असें समजण्यास हरकत नाहीं. तात्पर्य इतकेंच कीं शौर्याबरोबर क्रूरता नसावी, तर ज्ञान, सद्गुण, शांति व प्रेम यांसह शौर्य असलें पाहिजे; तरच त्याकडून जनहिताचीं विशाल कामें होतील.

**शौर्य, ज्ञान व सद्गुण यांचें एकीकरण.**

" मी शिल्पकलाविज्ञानी पोषक व धनिक लोक यांना उत्साहित करतें." हें पुढील विधान सर्वांनी लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ज्याप्रमाणें ज्ञानानें स्वस्थिति समजते, शौर्यानें स्वतःचें रक्षण करतां येतें, त्याचप्रमाणें कलाकौशल्यानें धन मिळवितां येतें. राष्ट्र श्रीमान होण्यालाहि त्यांत कलाकौशल्य वाढविण्याची आवश्यकता आहे. लोकांनी कारागिरीचे पदार्थ घेतले पाहिजेत, लोकांच्या गरजा काय आहेत तें पाहून कारागिर लोकांनी ते ते पदार्थ मुबक व स्वस्त उत्पन्न केले पाहिजेत, धनिकांनी कारागिर लोकांना मदत करून, कारखाने काढून पोषक बनलें पाहिजे इत्यादि गोष्टी झाल्यानें राष्ट्रामध्यें धनवृद्धि होईल. ज्या देशांत कारागिर नाहींत किंवा असून त्यांना द्रव्यबल नाहीं तो देश धनाढ्य होण्याची आशा नको. याच्यापुढें " विद्वानांचा सत्कार, त्यांच्याशीं मैत्री व परोपकार या गोष्टी करणारे जे लोक असतील त्यांना मी धन व बल देतें," हें दुसऱ्या मंत्रांतील शेवटचें विधान आहे. उन्नति करून घेण्याची ज्यांची इच्छा असेल त्याणें आपणापेक्षां जे थोर असतील त्यांचा सत्कार व त्यांच्याशीं स्नेह संपादन केला पाहिजे व इतर लोकांना आपणाकडून होण्यासारखें सहाय्य जें कांहीं असेल तें केलें पाहिजे. विद्वानांच्या संगतीनें त्यांच्या जवळचें ज्ञान आपणाला मिळतें व परोपकार केल्यानें लोकांची सहानुभूति आपणास मिळते. अशा रीतीनें त्याची उन्नति होत जाते. ही जशी एका व्यक्तीची स्थिति आहे

**कलाकौशल्य वृद्धीला धनिकांच्या सहाय्याची आवश्यकता.**

**सत्कार, स्नेह व उपकार.**

त्याचप्रमाणानें मोठ्या प्रमाणावर राष्ट्रासंबंधानेंहि जाणावें. राष्ट्राची प्रगति होण्यालाहि त्यानें आपल्यापेक्षां वरचढ राष्ट्राशीं स्नेह केला पाहिजे, त्याचा सत्कार केला पाहिजे व इतरांना सहाय्य करून त्यांची सहानुभूति संपादन केली पाहिजे. यज्ञामध्यें हेंच व्यापक तत्त्व आहे व त्याचा जे जे लोक उपयोग करतील त्यांची त्यांची उन्नति होईल यांत शंका नाहीं.

"मी राष्ट्रशक्ति उपास्यांमध्यें मुख्य, ज्ञानप्रिय, ऐक्यवर्धन करणारी व आवेश वाढविणारी आहें, म्हणून सर्व देशांतील विद्वान लोक माझ्यासाठींच सर्व प्रयत्न करतात." हा भावार्थ तिसऱ्या मंत्राचा आहे.

**लोक राष्ट्रभक्त झाले पाहिजेत.**

ऐक्य व ज्ञान यांचा अभाव असतां राष्ट्रशक्तीचाहि अभावच असतो. भिन्नता पावलेल्या व अज्ञानी लोकांमध्यें एक राष्ट्रीयत्वाची कल्पना येणार कोठून व जर ती नसली तर राष्ट्रभक्ति तरी त्यांच्यांत कशी वाढणार! ज्ञान नाहीं, एकी नाहीं, राष्ट्रभक्ति नाहीं, मग आवेशयुक्त कामें होणार तरी कशीं? तात्पर्य काय कीं ज्ञान, ऐक्यता व राष्ट्रभक्ति हीं पाहिजेत. राष्ट्रभक्तांनी राष्ट्राची उपासना हीच आधिं केली पाहिजे. अशा राष्ट्रभक्तांमध्यें जो विलक्षण आवेश असतो तो भक्तिहीनांमध्यें नसतो. अनन्यभक्तीनेंच ती शक्ति वाढत असते. अशा पवित्र कामाला राष्ट्रदेवतेच्या ठिकाणीं अव्यभिचारिणी भक्ति पाहिजे, म्हणजेच विलक्षण आवेश उत्पन्न होऊन लहान माणसांकडूनहि महान महान कार्यें होतात ही गोष्ट विद्वानांच्या प्रत्ययास आल्यामुळेंच सर्व देशांतील विद्वान्‌लोक राष्ट्राची भक्ति करतात व जें काय करावयाचें तें राष्ट्राप्रीत्यर्थच करीत असतात. जेथील लोक हीं आपलीं कर्तव्यें करीत नाहींत, ते राष्ट्रीयत्वाच्या उच्च पदवीपासून च्युत होऊन परावलंबी बनतात व अवनतीला जातात. हाच भावार्थ चवथ्या मंत्रांत निराळ्या शब्दांनी सांगितला आहे. "माझी भक्ति करणाराला बल, ज्ञान व भोग्यपदार्थ मिळतात व माझा तिरस्कार करणाराचा किंवा माझ्याविषयीं उदास असणाराचा नाश होतो." हें विधान स्पष्ट व आतांपर्यंत केलेल्या विवरणावरून सहज समजणार आहे. तात्पर्य इतकेंच कीं, मनुष्यांनी आपल्या राष्ट्राविषयीं उदासीन असतां नये, नेहमीं डोळ्यांत तेल घालून जपत असलें पाहिजे.

राष्ट्रभक्तांची उन्नति व राष्ट्रद्रोह करणारांची अधोगति होते "हें सर्वांला माहित आहे व राष्ट्रभक्तीच्याच योगानें वीर, ज्ञानी, बुद्धिमान् व सूक्ष्मदर्शी लोक उदयास येतात." हें पांचव्या मंत्रांतील विधान आहे. जो मनुष्य ज्याचा भक्त असतो, त्याच्यासाठीं तो आपलें सर्वस्व अर्पण करतो. तीच स्थिति राष्ट्रभक्तांची आहे.

राष्ट्रहितासाठीं शूर लोक आपले देह धारातीर्थी ठेवून कृतकृत्य होतात. ज्ञानी लोक ज्ञानप्रसारानें लोकांस सज्ञान करून स्वकर्तव्य करण्यास प्रवृत्त करतात. बुद्धिमान् व कल्पक लोक आपल्या कल्पना व युक्त्या लढवून, अनेक धंदे उभारून लोकांच्या पोषणाची सोय करतात. सूक्ष्मदर्शी लोक व अतींद्रियार्थदर्शी लोक पुढें कोणत्या दिशेनें कसें संकट येणार तें लोकांना आधिंच सुचवून जनतेचा फायदा करतात, किंवा अमुक दिशेनें प्रयत्न केला असतां असा महान् लाभ होईल असें आधिंच सांगून लोकांचीं सुखें वाढवितात. याप्रमाणें राष्ट्रभक्तीनें व उद्योगप्रियतेनें सर्व लोकांचा उदय होतो.

राष्ट्रभक्तीनेंच लोकांचा उदय होतो

सहाव्या मंत्रांत " मी दुष्ट व जुलमी लोकांचा नाश करण्यासाठीं विद्वानांला शास्त्र व शूरांला शस्त्रास्त्रें देऊन सज्ज करतें, त्यांच्याकडून युद्ध करवितें व चहूंकडे आवेशच आवेश करून सोडतें " हा भाव सांगितला आहे. दुष्ट व जुलमी लोकांच्या यमयातनांचा प्रतिकार करण्यासाठीं प्रथमतः सामोपचाराचा उपयोग कारावा, अर्थात् विद्वानांनीं प्रथमतः तडजोड होत असल्यास उपदेश करून किंवा चार युक्तीच्या गोष्टी सांगून पहावें. जर हा सामोपचाराचा मार्ग साधला तर फारच चांगलें, पण जर न साधला तर शूर लोक युद्धाचा मार्ग स्वीकारतात. हा नियम जगाच्या सर्व इतिहासांत दृग्गोचर होतो. कोणत्याहि देशाचा इतिहास पाहिला तरी त्यांत हे दोन मार्ग स्वीकारलेले आढळून येतात.

सामोपचार व युद्ध.

सामोपचारानें किंवा युद्धानें लोकांस इष्ट गोष्टी प्राप्त झाल्यानंतर राष्ट्रनियंतृत्व कोणाकडे असावें हा एक नाजुक व फार महत्त्वाचा प्रश्न पुढें येतो. " राष्ट्रशक्तीच्या योगानेंच राष्ट्रावर नियामकाची योजना होते. " हें सातव्या मंत्रांतील पहिलें विधान आहे. हें विधान समजण्यासाठीं राष्ट्रशक्तीचा प्रभाव कोणकोणत्या मनुष्यांमधून पडतो, अर्थात् राष्ट्रशक्तीचा आविर्भाव होण्यास कोणत्या पुरुषांचें सहाय्य लागतें तें पाहिलें पाहिजे. हें प्रथममंत्रांत सांगितलेलें आहे. ब्रह्मचारी, विद्वान्, स्वावलंबी, शूर, धनिक, धैर्यवान् , पराक्रमी, बुद्धिमान् अशा मनुष्यांच्या सहाय्यानें राष्ट्रशक्ति काम करते किंवा तिचा आविर्भाव अशा लोकांमधून होतो. अर्थात् राष्ट्रशक्तीचे हे प्रतिनिधी आहेत, किंवा राष्ट्रशक्तीचे हे अंश आहेत अथवा राष्ट्रशक्तीला जर आत्मा असें मानलें तर हे देहाच्या ठिकाणीं होत. अर्थात् राष्ट्रशक्तीला जें कांहीं करावयाचें तें यांच्याकडूनच केलें जातें. जर असें आहे तर राष्ट्रावर नियामकाची योजनाहि हेच करणार हें उघड आहे, कारण राष्ट्रशक्ति ही यांच्याशिवाय निराळी—भिन्नरूपानें—राहूं शकतच नाहीं.

राष्ट्रनियामक.

यावरून एवढं ठरलं कीं, हे लोकच राष्ट्रावर नियामकाची योजना करणार पण ती कोणाची हें आतां पहावयाचें आहे. हे लोक स्वतः ज्ञानी आहेत व राष्ट्रोन्नतीसाठीं आपले जीव अर्पण करण्यासहि तयार झालेले आहेत. अशा स्थितींत हे पक्षपात करतील किंवा स्वार्थानें अन्याय करतील हें संभवत नाहीं. अशा लोकांनीं जो निवडला जाईल तो राष्ट्रनियामकत्वाला योग्य असेलच यांत शंका नाहीं. अशा वेळीं वाडव-डिलांच्या नांवांवर विकणारांना कोणीहि विचारणार नाहीं, किंवा लांचलुचपतीचीहि कोणी परवा करणार नाहींत. जो सर्वांत जास्त गुणी असेल त्याचीच तक्तावर योजना होईल व त्यालाच सर्व लोक राष्ट्रनियामक मानतील. हा हक्क जन्मानें मिळ-णारा नसून गुणांनी व कर्तबगारीनें मिळणारा असतो हेंहि कोणी विसरतां कामा नये.

"व्यापक मनोवृत्ति, व्यापक कर्मे, ऐक्य व उत्कर्षाची इच्छा या गोष्टी असतील तेथें राष्ट्रशक्तीची उत्पत्ति होते व तेथेंच आनंदीआनंद नांदूं लागतो." हा भाव सातव्या मंत्रांतील शेष राहिलेल्या भागाचा आहे. ही गोष्ट उघड आहे कीं संकुचित

**संकुचित मनो-वृत्ति व व्यापक मनोवृत्ति.**

मनोवृत्तींचे लोक आपलीं व्याप्तिवर्तुळें लहान लहान करीत आपल्या एकट्याच्या सुखामध्येंच कृतकृत्यता मानतात. यांच्या या हीन मनोवृत्तींमुळें कलह, द्वेष व विरोध यांचा प्रादुर्भाव होतो. पण जेथें व्यापक मनोवृत्ति असतात तेथें ऐक्य वाढतें, जनतेच्या सुखाकडे लक्ष जातें, समाजसुखवृद्धीसाठीं एकट्याच्या सुखाची हानि झाली तरी त्याला पर्वा वाटत नाहीं व अशा रीतीनें एकराष्ट्रीयत्वाची कल्पना उत्पन्न होते, राष्ट्रांतील सर्व जनांला आपण एकच आहों असें वाटून त्यांच्यांत संघशक्ति वाढते व स्वस्थितीचा अनुभव आल्यानंतर राष्ट्रभक्ति जागृत होते. याच जागृती-मधून आनंदाचा झरा वाहत असतो. अर्थात् राष्ट्रीय उन्नति होण्यास लोकांमध्यें व्यापक मनोवृत्ती झालेल्या असल्या पाहिजेत. संकुचित वृत्तींनी हें काम होणें नाहीं.

"राष्ट्रशक्तीचा अंकूर वाढूं लागला म्हणजे त्याचा प्रसार झंझावाताप्रमाणें चहूंकडे होतो, शारीरिक व मानसिक शक्तींपेक्षांहि त्याचा जोर जास्त असतो, म्हणूनच तिची मुख्य उपास्यांत गणना झालेली आहे" हा आठव्या मंत्रांतील भाव आहे व तो प्रत्येक राष्ट्राच्या इतिहासांत आपणास पहावयास सांपडेल. इतिहासकार या

**राष्ट्रशक्तीचा जोर.**

शक्तीला लाटेची उपमा देतात. जशी समुद्राची लाट बेपर्वा-ईनें पुढें येते व किनारा झाडून साफ करिते त्याचप्रमाणें ही राष्ट्रशक्तीची लाट येऊं लागली म्हणजे ती जुलुमी लोकांच्या अंतःकरणरूपी किनाऱ्यावर आपटून त्यांना विदीर्ण करते. या लाटेमध्यें अशी विलक्षण शक्ति आहे कीं, जुलमी लोक व अज्ञानी लोक ही न यावी म्हणून खटपट

करीत असतात, पण आश्चर्य हें कीं, त्यांच्या उलट दिशेनें चाललेल्या प्रयत्नांनीच ही बळावत असते. जसे त्यांचे हिला दाबून टाकण्याचे प्रयत्न चालतात तसतशी ही जोरांत येते. हा दैवी राष्ट्रशक्तीचा विलक्षण प्रकार आहे.

याप्रमाणें या राष्ट्रीसूक्ताचा अर्थ आहे. येथें विचारी वाचकांनीं हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, वेदमंत्रांत एकाच वाक्यानें अनेक अर्थ दाखविलेले असतात तसें अन्यत्र नसतें **हाच भेद सामान्य वाङ्मय व वैदिक वाङ्मय यांत आहे.** वैदिक धर्माचा उद्देश धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे साधावयाचा आहे व मोक्ष हा अंतिम पुरुषार्थ आहे. तो परमात्मज्ञानानें साधणारा आहे. म्हणून सर्व मंत्रांतून परमेश्वराचें ज्ञान दिलेलें असतें व त्या बरोबरच भौतिक, सामाजिक, राजकीय वगैरे विषयांचें ज्ञानहि गोंवलेलें असतें. या अद्भुत व बुद्धिपूर्वक रचनेमुळेंच साधारण लोकांना वेदाचा अर्थ समजत नाहीं, कित्येकांना तो घोंटाळ्याचा वाटतो, पण ज्यांना समजतो ते त्यांतच रममाण होत असतात. असो तात्पर्य इतकेंच कीं या सूक्तामध्यें परमेश्वरपर अर्थ आहे. तो पहावयाचा असतां थोडेंसें शब्दार्थाजवळ नीट लक्ष दिलें पाहिजे. तो अर्थ असा. "मी ( वसु ) अग्नि, पृथिवी, वायु, अंतरिक्ष, आदित्य, द्यौ, नक्षत्रें व चंद्र या आठ वसूंमध्यें, ( रुद्र ) प्राण, अपान, व्यान, उदान, समान, नाग, कूर्म, कृकल, देवदत्त, धनंजय व आत्मा हे अकरा रुद्र व ( आदित्य ) बारा महिने हे बारा आदित्य यांमध्यें व्यापून आहें व मित्रावरुणादिकांना माझाच आधार आहे. यज्ञ करणाऱ्यांना मीच धन व बल देतों व शत्रूंचा नाश करणाऱ्याला बल मीच देतों. मी मुख्य उपास्य व भक्तांच्या इच्छा पुरविणारा सर्वव्यापक आहें. माझी उपेक्षा करणारे नास्तिक लोक नाश पावतात व आस्तिक्य बुद्धि धारण करणारे चारहि पुरुषार्थ साधतात. माझ्या साक्षात्कारानेंच ऋषित्व वगैरे प्राप्त होतें" इत्यादिप्रकारानें परमेश्वरस्वरूपाचा वर्णनात्मक भाग विचार करून वाचकांनी जाणावा. परमेश्वर सर्वव्यापक आहे इत्यादि ज्ञान झाल्यानें मनुष्यें नीतिमान् होतात व नीतिमान् मनुष्येंच राष्ट्रीय उन्नतीला पाहिजे असतात. या साठीं राष्ट्रीय उन्नति कशी होते तें सांगून परमेश्वराचें सर्वव्यापित्वहि पर्यायानें सांगितलें आहे. या दोहोंचा संबंध अगदीं निकट आहे हेंहि वाचकांनी विसरतां नये.

**राष्ट्रीसूक्ताचा मुख्य परमेश्वरपर अर्थ.**

**ईश्वराचें सर्वव्यापित्व.**

**ओम् । शान्तिः । शान्तिः । शान्तिः ॥**

# शुद्धिपत्रक.

| पृष्ठ. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १ | २१ | भरति | भवति |
| २ | ३ | निरुक्तं | निरुक्तम् |
| २ | १७ | वसू | वसु |
| ४ | १८ | च | ( च ) |
| ४ | १९ | तथाच | ( तथाच ) |
| ४ | २१ | शंकराचार्यै: | शंकराचार्या: |
| ५ | ८ | पूपणं | ( पूषणम् ) |
| ५ | १८ | साधन व संपन्न | साधनसंपन्न |
| ५ | २६ | अस्मि | ( अस्मि ) |
| ६ | १० | { त्याची शक्ति वाणी ही राष्ट्राची शक्ति आहे } | { त्या राष्ट्राची जी वाणी ही शक्ति आहे } |
| ७ | १२ | चित्तैकाग्र्यणे | चित्तैकाग्र्येण |
| ७ | २१ | श्रद्धालू | श्रद्धालु |
| १२ | २ | झाली आहे | झाल्यें आहे |
| १४ | ३ | धात्वथा | धात्वर्था |
| १४ | २७ | अथ | अर्थ |
| १६ | २६ | मधींल | मधील |
| १८ | २१ | सूत्राच्या | सूक्ताच्या |
| १८ | २७ | आलेल | आलेला |
| १८ | ३२ | दिसतें | दिसत |
| १९ | ११ | हें वरें | हें खरें |
| २४ | १२ | कारावा | करावा |

स्वस्त ! **चारी मूल वेद.** अति स्वस्त ! !

ज्या परम पित्यानें आमच्या हितार्थ पृथिव्यादि अनेक पदार्थ रचले त्यानेंच आमच्या जीवनसाहाय्यार्थ सृष्टीचे आरंभीं वेदद्वारें ज्ञानाचेंहि दान केलेंच आहे. आणि त्याच ज्ञानानें आम्हीं एक वेळ उन्नतीच्या शिखरावर चढलों होतों. पण हल्लीं ? वेदज्ञानाच्या परित्यागानेंच आम्हीं अवनति भोगित आहों.

बायबल व कुराण ज्याच्या संग्रहीं नाहीं असा एक तरी ख्रिस्ती व महंमदानुयायी असेल काय ? मग ज्ञानाच्या शिखरावर नेऊन बसविणारे वेद ( आमचे धर्मग्रंथ ) आम्हां आर्यांच्या संग्रहीं नसावे ही किती लाजिरवाणी गोष्ट आहे !

| | कि. रु. | आ. | पै. |
|---|---|---|---|
| चारी मूल वेद ... ... ... ... ... ... ... | ५ | ० | ० |
| चारी वेदांची अनुक्रमणिका ... ... ... ... ... ... | १ | ८ | ० |
| शतपथ ब्राह्मण संपूर्ण १४ कांड ( हा प्रसिद्ध आर्षग्रन्थ आजपर्यंत भारतवर्षात छापलेला नव्हता ) मूलमात्र ... ... ... | ४ | ० | ० |
| दशोपनिषद् मूल ( एक पुस्तक ) ... ... ... ... ... | ० | १० | ० |
| निघण्टु-वेदांचा कोश, अकारादिक्रमानें अनुक्रमणिकेसहित ... ... | ० | ४ | ० |
| निरुक्त मूलमात्र ... ... ... ... ... ... ... | १ | ० | ० |
| अष्टाध्यायी मूलमात्र पाणिनि आचार्यकृत, शुद्ध केलेली ... ... | ० | ४ | ० |
| धातुपाठ धातूंच्या अकारादिक्रमानें अनुक्रमणिकेसहित ... ... | ० | ५ | ० |

## मराठी पुस्तकें.

| | | | |
|---|---|---|---|
| वैदिकधर्मस्वरूप ... ... ... ... ... ... ... | १ | ० | ० |
| ईश्वरस्वरूप ... ... ... ... ... ... ... ... | ० | ० | ६ |
| ब्रह्मचर्य ... ... ... ... ... ... ... ... | ० | ४ | ० |
| राष्ट्रीय उन्नतीचीं तत्वें ... ... ... ... ... ... | ० | २ | ० |
| राष्ट्रीसूक्त ... ... ... ... ... ... ... ... | ० | १ | ६ |
| शतशब्दरत्नमाला, ईश्वरादि शंभरशब्दांच्या कविताबद्धव्याख्या, लहान मुलांस कंठ करविण्यास फारच उपयोगी ... ... | ० | ० | ९ |
| देशाटन-ब्रह्मचारी नित्यानन्द यांचें व्याख्यान ... ... | ० | २ | ० |
| लोकमान्य अठरा पुराणें कोणीं लिहिलीं ? याचें उत्तर ... ... | ० | ० | ३ |
| वैदिकसंध्योपासनविधि ... ... ... ... ... ... | ० | ० | ६ |

वरील पुस्तकांचें टपाल हांशील निराळें पडेल.

**शामराव कृष्ण आणि मंडळी, ठाकुरद्वार, मुंबई.**

---

**मुंबई.**-खेतवाडी मेनरोडवर घर नं. ८१ येथें "तत्त्वविवेचक" छापखान्यांत रा. भिवा हरी यांनीं मालकाकरितां छापिलें.